*लोकसाहित्य माला*

# झाडावर चढणारा कोल्हा

## आणि आफ्रिकेतील इतर प्राणीकथा


निवेदक

**निक ग्रीव्हज्**

चित्रे

**रॉड क्लेमेन्ट**

अनुवाद

**व्यंकटेश माडगूळकर**





**नेशनल बुक ट्रस्ट, इंडिया**

*माझे वडील रोलॅन्ड यांना अर्पण*



**1988 मध्ये खालील संस्थेने प्रथम इंग्रजीत प्रकाशित केले.**

David Bateman Ltd.,
'Golden Heights,'
32/34, View Road,
Glenfield, Auckland 10,
New Zealand

ISBN 81-237-2605-8

---

1999 (शके 1920)

When Hippo Was Hairy *(Marathi)*
रु. 90.00
संचालक, नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया,
ए-5, ग्रीन पार्क, नवी दिल्ली 110016 यांनी प्रकाशित केले.

# अनुक्रमणिका

# ऋणनिर्देश

हे पुस्तक तयार करण्यात अनेकांचा हातभार लागलेला आहे. त्यातल्या काहींचा जाणीवपूर्वक तर काहींचा न कळत. या सर्वांनी मला जे काही सल्ले दिले आणि जी काही जादा माहिती पुरविली त्याबद्दल मी त्या साऱ्यांचा ऋणी आहे. त्यांचा उल्लेख खालीलप्रमाणे :

झिम्बाब्वेच्या नॅचरल हिस्ट्री म्युझियममधील मॅमॉलॉजीचे माजी क्युरेटर डॉ. जॉन हटन, हर्पिटॉलॉजीचे क्युरेटर डॉ. जॉन ब्रॉडले, व्हांगे नॅशनल पार्कचे माजी प्रोव्हिन्शियल वॉर्डन श्री. रॉन थॉम्सन, मॅटोपोस नॅशनल पार्कचे माजी वॉर्डन श्री. इयान थॉम्सन, मॅटविलिलॅन्ड (दक्षिण) चे प्रोव्हिन्शियल वॉर्डन श्री. इव्हान न्कुबे, व्हान्गे नॅशनल पार्क, झिम्बाब्वे डिपार्टमेन्ट ऑफ नॅशनल पार्कस आणि वाईल्डलाईफ मॅनेजमेन्ट या तिन्ही संस्थांचे टेरेस्ट्रिअल एकॉलॉजिस्ट श्री. माईक जोन्स, केन्या वाईल्डलाईफ कॉन्झरव्हेशन ॲन्ड मॅनेजमेन्टचे डॉ. रोसाली ओसबोर्न, श्री. फ्रॅन्सिस ओडूम आणि घानाची लॅन्ग्वेज इंस्टिटयूट.

या खेरीज झिम्बाब्वेच्या नॅचरल हिस्ट्री म्युझियमच्या ग्रंथालयातील प्रमुख ग्रंथपाल श्री. हडेबे, श्री. बुकी व श्री. रिच पीक यांचे तर मी खास आभार मानतो.

अमेरिकेतल्या कोडॅक कंपनीकडून आणि जपानमधल्या कॅनन इन्कॉर्पोरेटेड या कंपनीकडून खूप मोठी तांत्रिक माहिती व मदत मला पुरविली गेल्याने त्यांचा उल्लेख येथे केलाच पाहिजे. त्यांनी पुरविलेल्या छायाचित्रांचा उपयोग या पुस्तकाचे चित्रकार श्री. रॉड क्लेमेन्ट यांना नक्कीच झाला असला पाहिजे.

परंतु या सर्वांपेक्षाही ज्यांनी माझे बोलणे हे अत्यंत सहनशीलतेने ऐकून घेत कामे केली, ते माझे टंकलेखक, सहसंपादक व माझा मुलगा डग्लस यांचा मी येथे कृतज्ञापूर्वक उल्लेख करतो.

आफ्रिका खंडामध्ये अगदी परवा परवा पर्यंत जंगलातील नाना प्राणी प्रचंड संख्येने नांदत होते. एवढी संख्या आणि एवढी विविधता जगात इतरत्र कुठेही नव्हती. प्राण्यांचे ते विशाल कळप आज मात्र आफ्रिकेत दिसत नाहीत. ही बाब उदास करणारी आहे. 'शेवटच्या प्राण्यापर्यंत नजर पोहचतच नाही' एवढे विस्तृत कळप असलेले हे दृश्य आता भूतकाळात जमा झालेले आहे.

एकोणिसाव्या शतकाची सुरूवात होईपर्यंत संशोधक, धर्मोपदेशक, धाडशी प्रवाशी, शिकारी असे मूठभर लोक सोडले तर इतरांना आफ्रिकेच्या आतील भाग म्हणजे एक गूढ होते. थॉमस बेन्स, डेव्हिड लिव्हिंग्स्टन, पी. कोर्टेन्ली सेलोस आणि जोनाथन स्पेक हे लोक आपल्याला, "पूर्व आफ्रिकेचे पठार आणि कारू ह्या भागात एके काळी जंगलप्राणी–वैभव केवढे संपन्न होते," हे त्यांच्या लेखनातून सांगतात.

पण याच माणसांतले घरंदाज शिकारी, शहाण्णव कुळी पदयात्री, हस्तिदंत मिळविण्यासाठीच शिकारी झालेली माणसे आणि जरूर पडली म्हणून हत्यार उचलणारे शेतकरी यांनी वन्य प्राण्यांचे एवढे तुफान शिरकाण केले की आफ्रिकेतल्या काही भागातले खास प्राणी कायमचे नाहीसे झाले. त्यांचा वंशखंड झाला.

आफ्रिकेतल्या ह्या निसर्गदत्त श्रीमंतीची आणि सौंदर्याची जाण आज लोकांना आहे, हे सुदैव. जी थोडी ठिकाणे आज उरलेली आहेत ती जतन करण्यासाठी पुष्कळच केले जाते आहे.

आफ्रिकेची लोकसंख्या झपाट्याने वाढते आहे. लोकसंख्या वाढली की अन्नाची नि पर्यायाने जमिनीचीही मागणी वाढते. आज जमिनीगरजू लोक अभयारण्ये, राखीव अरण्ये यांच्याकडे मत्सराने बघू लागले आहेत. मागे झाला तसा विध्वंस न होता इथून पुढे आफ्रिकेची प्रगती होईल असा विश्वास आपण बाळगूया.

पूर्वी विपुल प्रमाणात असणाऱ्या वन्य पशुपक्षांचा वारसा म्हणजे आज उपलब्ध असलेल्या कहाण्या आणि दंतकथा. इतिहासात जमा झालेल्या जंगलजीवनाची समृद्धी ह्या कथा कहाण्यांतून कळते. वेगवेगळ्या टोळ्यांतून सांगितल्या जाणाऱ्या कहाण्यांतील तपशीलात फरक आढळला तरीही त्या सगळ्या मुळात एकसारख्याच आहेत. आज आपल्याला, आणि पुढे आपल्या मुलाबाळांना, जगण्यातला आनंद आणि जगण्यासाठी लागणारे शहाणपण ह्या कथाकहाण्याच देतील.

संख्येने सतत विस्तारत राहिलेल्या नगरवासी लोकांना ह्या कथा कहाण्यांचा परिचय तर घडावाच, शिवाय आजच्या आफ्रिकेतील नाना प्राण्यांसबंधी माहितीही कळावी असा ह्या पुस्तकामागचा उद्देश आहे.

जुन्या लोकांनी सांगितलेल्या गोष्टी रद्दबातल कराव्यात असे नाही. प्राणी-जीवनाचे प्रत्ययकारी चित्रण करणाऱ्या लोकांना प्रेरणा देणाऱ्या ह्या कहाण्या, ह्या दंतकथा हा आफ्रिकेचा एक मूल्यवान दस्तऐवज आहे. तो कधीही विस्मृतीत जाणार नाही.

# सर्वसाधारण माहिती

**भौगोलिक विस्तार** (नकाशे पहा)

ह्या पुस्तकात ज्यांचा प्रामुख्याने उल्लेख आहे .ते सगळे प्राणी आफ्रिका खंडाच्या दक्षिण भागात आढळतात. काही प्राणी मात्र आफ्रिकेत सर्वत्र पसरलेले आहेत. त्सेसिबी, रॉक डेझी, चॅक्म बॅबून यांचे जवळचे नातेवाईक आफ्रिकेच्या इतर भागात आहेत. हे जवळचे नातेवाईक म्हणजे कोंगोनी (त्सेसिबी सारखा पूर्व आफ्रिकेतला हर्टबीस्ट), पिवळे ठिपके अंगावर असलेला रॉक डेझी, आणि पिवळसर बॅबून सारखेच दिसतात. हे एकसारख्या भौगोलिक वातावरणात राहतात, त्यांच्या रहाण्या-वागण्याच्या पद्धती सारख्याच असतात. पण सूक्ष्मातिसूक्ष्म असे जे ह्यांच्यामधील भेद आहेत ते स्वतंत्र वेगळ्या जाती मानण्याला पुरेसे आहेत असे तज्ज्ञांचे म्हणणे आहे.

अभयारण्ये, राष्ट्रीय उद्याने आणि सतत कमी कमी होत असलेला रानवा ह्या मर्यादेतच आता ह्या जातीची जनावरे राहिली आहेत. आता ह्या विभागाचे व्यवस्थापन माणसाने फार काळजीने करीत राहिले पाहिजे. तिथले पर्यावरण निरोगी राखले पाहिजे. तिथले प्राणी आणि वनस्पती ह्यांतला प्रत्येक सभासद निरोगी राहील याची दक्षता घेतली पाहिजे. हत्ती आणि रानम्हैसे ह्यांसारखे बलदंड प्राणी उतू जाण्याइतके वाढू न देता ह्या भूमीला भार होतील एवढेच ठेवले पाहिजेत.

बॅबून, कोल्हे, बिबळ्या ह्या जातींच्या जनावरांनी माणूस प्राण्याकडून सतत छळ होऊनही मानवी वस्तींचा आधार घेतला आहे. त्यामुळे ते अधिक विस्तृत भागातून पसरलेले आढळतात.

माणसातील शिकारचोरांमुळे काळ्या गेंड्यासारखे प्राणी आता संख्येने कमी झाले आहेत. त्यांच्या वस्तीचे क्षेत्रही कमी झालेले आढळते.

पांढरे गेंडे मात्र जवळजवळ नामशेष होत आले असताना वाचले आहेत. प्राण्यांना वाचवण्याच्या प्रयत्नात आफ्रिकेला मिळालेले हे मोठेच यश आहे. झुलूलॅण्डमधल्या एका अभयारण्यात अखेरच्या काही गेंड्यांना संरक्षित असे साठ वर्षे जतन केल्यावर त्यांची संख्या वाढली. आत ज्या ज्या भागात पूर्वी पांढरे गेंडे होते त्या भागात ते नेऊन सोडणे सहज शक्य आहे.

उत्तर आफ्रिकेतले पांढरे गेंडे मात्र असे नशिबवान ठरले नाहीत. शिकारचोरांनी पद्धतशीरपणे केलेल्या मार पकडीमुळे त्यांचा वंशखंड झाला आहे. ह्या पुस्तकात दिलेल्या नकाशामुळे एखाद्या प्राण्याचे वसतिस्थान कुठे कुठे आहे, त्याचा भौगोलिक विस्तार किती आहे याचा अंदाज घेण्यास मदत होते. परंतु नकाशात दाखविलेल्या एखाद्या प्राण्याची जात ही त्या भौगोलिक विस्तारात कधी कधी फार मोठ्या प्रदेशातही आढळत नाही. याचे कारण माणसांच्याकडून त्या भागात होणारी विविध कार्ये, विशेषत: जर त्या प्राण्यापासून आपल्याला धोका आहे असे माणसांना वाटले किंवा त्या भागात तीव्र

# आफ्रिका : वनस्पती विभाग




संदर्भ : कॉलिन्स एंक. लंडन, दुसरी आवृत्ती 1992

जीवनसंघर्ष असेल तर असे होते. उदाहरणाने हे नीट दाखवता येते. जेव्हा युरोपीय वसाहतवादी चार शतकांपूर्वी आफ्रिकेत अवतरले तेव्हा प्राण्यांच्या बहुतेक साऱ्या जाती या संपूर्ण आफ्रिका खंडात, पार अगदी खाली केप ऑफ गुड होप येथपर्यंत आढळत होत्या. पण नंतर होत गेलेली प्राण्यांची शिकार नि काही प्राण्यांच्या मागे तर हात धुवून सतत माणसे पिच्छा पुरवत गेल्याने मोठ्या सस्तन प्राण्यांच्या ज्या जाती आता आफ्रिकेत शिल्लक राहिल्या आहेत त्या फक्त थोड्याशा अभयारण्यातच. पूर्व आफ्रिकेत मानवी लोकसंख्या भयावह वेगाने वाढत असल्याने तेथील वन्य जीवनावर असेच संकट आले आहे. मैदानी प्रदेशातील दुर्बल व भित्र्या प्राण्यांच्या जाती तिथून नाहीशा होत जात आहेत.

आफ्रिकेतील वनस्पतींच्या दृष्टीने जर नकाशा पाहिला व त्या अनुषंगाने वन्य जीवनाच्या विस्ताराची तुलना केली तर अनेक नवीन गोष्टी ध्यानात घ्याव्याशा वाटतील. अशा अभ्यासाने प्राण्यांच्या सवयी, त्यांचे खाणेपिणे, इत्यादिंची माहिती सहज काढता येते.

**माहिती**

एखाद्या प्राणीजातीचे आकारमान, वजन, आयुर्मान, इत्यादि बाबी सरासरीने विचारात घेतल्या तर त्या खऱ्या माहितीच्या अधिक जवळपास पोहोचतात. रोलंड वॉर्ड ट्रॉफी या कोष्टकानुसार तसा केलेला प्रयत्न मात्र तितकासा बरोबर ठरत नाही. निरनिराळ्या प्राण्यांचे जीवन, त्यांच्या आकारमानातील फरक हे नीट सखोल जाणून घेण्यासाठी ही अशी माहिती फार उपयोगी पडते.

या पुस्तकात दिलेली प्राण्यांची उंची ही त्यांच्या खांद्यापर्यंतची धरली आहे. जर अन्य प्रकारे धरली असेल तर तसा त्यावेळी उल्लेख केला जातो.

**आफ्रिकेतील जमाती**

आफ्रिकेतील भूमीपुत्रांच्या निरनिराळ्या जमातींमध्ये भाषा, चालीरिती व वेषभूषा यांच्यात जरी बरीच भिन्नता आढळत असली तरी लोककथांमध्ये, कहाण्यांमध्ये, दंतकथांमध्ये आपल्याला ज्या प्राचीन परंपरा सापडतात त्यात सर्वत्र सारखेपणा दिसून येतो. अन् संपूर्ण आफ्रिका खंडभर हे असेच असल्याने ही बाब फार लक्षणीय वाटते. 'उमव्हंडला ससा' ह्या व्यक्तिरेखेची छाप ही आफ्रिकेतील अनेक भाषा, उपभाषा यांमधील कथांमध्ये पडलेली आहे. इंग्रजीमधील ब्रेर रॅबिट नावाच्या सशाच्या कथांचा उगम हा अमेरिकेत सक्तीने पाठविण्यात आलेल्या आफ्रिकन गुलामांच्यामध्ये आढळतो, असे आता विचारपूर्वक लक्षात घेतले जाते. हे गुलाम कित्येक शतकांपूर्वी पश्चिम आफ्रिकेमधून धरून सक्तीने त्यांची पाठवणी 'नवीन जगात' केली होती. आफ्रिकाभर पसरलेल्या बांटू जमातीची मुळेही मध्य आफ्रिकेच्या पश्चिम भागामध्ये सापडतात. ह्या ऐतिहासिक सत्यामुळे अनेक कथा व विषय यांमध्ये सारखेपणा का आढळतो याचा खुलासा होतो. गेल्या 2,000 वर्षांमध्ये हे बांटू जमातीचे लोक आफ्रिकेच्या मध्य भागात, पूर्व भागात आणि दक्षिण भागात अधिकाधिक पसरत गेले आहेत. अन् जिथे जिथे ते पोचले तेथील मूळच्या स्थानिक लोकांना जिंकून त्यांनी त्यांना आपल्या स्वतःच्या संस्कृतीत पार पचवून टाकले.

## मोजमापाचे कोष्टक

जनावरांची मोजमापे ही काही देशांत दशमान मापन पद्धतीनुसार (ग्रॅम, किलोग्रॅम, सें. मी., मीटर, इ.) घेतली जातात. तर अन्य ठिकाणी ती ब्रिटिश मापन पद्धतीनुसार (औंस, पौंड, फूट, इंच वगैरे) घेतली जातात. या पुस्तकात वाचकांच्या सोयीसाठी उंची फुटात व वजन किलोग्रॅममध्ये दिलेले आहे. (खालील कोष्टकात मात्र दशमान मापन पद्धतीनुसार सर्व मोजमापे दिली आहेत.)

| प्राणी | उंची (मीटर) | | वजन (किलोग्रॅम) | | जन्मल्यानंतरचे वजन (किलोग्रॅम) | |
|---|---|---|---|---|---|---|
| | नर | मादी | नर | मादी | नर | मादी |
| सिंह | 1 | 0.90 | 200 | 130 | 1.5 | 1.5 |
| बिबळ्या | 0.75 | 0.70 | 70 | 60 | 0.45 | 0.45 |
| चित्ता | 0.75 | 0.75 | 60 | 55 | 0.300 | 0.300 |
| रानकुत्रा | 0.65 | 0.65 | 30 | 25 | 0.500 | 0.500 |
| तरस | 0.65 | 0.70 | 60 | 70 | 1.5 | 1.5 |
| कोल्हा | 0.40 | 0.38 | 10 | 8 | 0.200 | 0.200 |
| हत्ती | 3 | 2.5 | 5000 | 3500 | 120 | 120 |
| पांढरा गेंडा | 1.8 | 1.6 | 3000 | 2000 | 40 | 40 |
| काळा गेंडा | 1.4 | 1.2 | 1500 | 1000 | 40 | 35 |
| पाणघोडा | 1.5 | 1.2 | 3000 | 2000 | 30 | 30 |
| रानम्हैस | 1.6 | 1.5 | 700 | 600 | 40 | 40 |
| बॅबून | 1 | 0.80 | 30 | 18 | 0.250 | 0.250 |
| जिराफ | 5.5* | 5* | 1200 | 900 | 100 | 100 |
| पाणकाळवीट | 1.3 | 1.2 | 250 | 200 | 8 | 8 |
| झेब्रा | 1.2 | 1.2 | 320 | 280 | 30 | 30 |
| त्सेसिबी | 1.2 | 1.2 | 160 | 145 | 10 | 10 |
| चामखिळ्या डुक्कर | 0.72 | 0.70 | 70 | 60 | 0.800 | 0.800 |
| ससा | 0.15 | 0.15 | 2.5 | 2 | 0.080 | 0.080 |
| डॅझी | 0.20 | 0.20 | 4 | 3 | 0.250 | 0.200 |
| शहामृग | 2 | 1.8 | 140 | 120 | 1.5 | 1.5 |
| कासव | 0.20 | 0.22 | 1.5 | 2 | 4**सें.मी. | 4**सें.मी. |

* जिराफाची पार डोक्यापर्यंतची पूर्ण उंची

•• अंड्यातून बाहेर आल्यावर नर व मादी कासवांची लांबी

# सुरुवात अशी झाली ...

निर्मात्याने ही पृथ्वी निर्माण केली. तिच्यावर झाडेझुडे, गवत-वेली केल्या आणि मग इथं कोण कोण रहावे याचा विचार केला. भल्या लट्ठ बुंध्याच्या गोरख चिंचेपासून त्याने प्राणी निर्माण केले. चिंचेच्या मुळाशी असलेल्या ढोलीतून एक एक प्राणी बाहेर पडला. निर्मात्याने त्याला नाव दिले. राहण्याची जागा ठरवून दिली. ह्या कामात त्याला मान्टीसने मदत केली. हा मान्टीस म्हणजे एक महाजीवात्मा आणि निर्मात्याचा मदतगार होता. मान्टीस हाताशी होता तरी सगळ्या प्राण्यांना बाहेर यायला, नावे द्यायला बराच काळ लागला. अगदी अखेरीला माणूस हा प्राणी आला.

आता ह्या महान अवस्थेतली एक भूमिका बाकी उरली होती ती निर्मात्याने आणि मान्टीसने आदिवासींच्यावर सोपवली. ही भूमिका होती जंगलात, रानावनात मिळून मिसळून रहाण्याची; तिथे निसर्गाच्या व शिकारीच्या साहाय्याने आपले अस्तित्व टिकवण्याची. आदिवासींनी आपल्या वाट्याला आलेली ही भूमिका अगदी चोख बजावली. जनावरे, पक्षी. वनस्पती यांच्याशी आदिवासी गुण्यागोविंदाने वागले.

तपशिलातला थोडाफार फरक सोडला तर सर्वच आदिवासी जमातींचे 'जनावरे ही माणसाआधी जन्मली' ह्या बाबतीत एकमत आहे.

स्वाझी आदिवासींच्या कहाणीनुसार माणसाच्या जन्माआधी जंगलातले प्राणी सुखाने एकत्र नांदत होते. माणूस पृथ्वीवर जन्माला आला आणि मांस खाणे हा प्रकार सुरू झाला, जगभर पसरला. माणूस पशूंना खाऊ लागला. हिंस्त्र पशू पूर्वीचे मित्र असलेल्या प्राण्यांना खाऊ लागले. फार काय सांगावे, पक्षी आणि सरपटणाऱ्या प्राण्यांनीही माणसांचा कित्ता गिरवला.

तात्पर्य, ह्या पृथ्वीवर माणूस आला आणि भीतीचा जन्म झाला!



# सिंह गर्जना का करतो?

(बाटोन्का लोकांमधील कथा)

**मा**णूस नावाचा प्राणी जगात जन्माला आला आणि त्यानंतर पुढच्या काळात, जिवंत प्राणी मारून त्यावर आपले पोट भरणारे जे जे प्राणी होते त्या सगळ्यांत सिंह हा भारी ठरला. सगळे प्राणी त्याला घाबरून राहू लागले. (माणसाचे बघूनच इतर प्राणी मांस खाऊ लागले या संबंधीची दंतकथा तुम्हाला आठवत असेल.) सुरुवातीला सिंहाचा आवाज इतर प्राण्यांसारखाच बेताचा असा होता. त्याला गर्जना करायला येतच नव्हत्या. त्यामुळे तो गुपचूप गवतखाऊ जनावरांवर झडप घालून त्यांना मारायचा आणि खाऊन टाकायचा. फार खटाटोप करावा लागायचा नाही.

सिंह शिकार करायला बाहेर पडला आहे हे अजिबात कळायचं नाही. सगळी जनावरं सतत भितीखाली वावरायची. एके दिवशी त्यांनी सगळ्या जनावरांची बैठक बोलावली. बैठकीत यावर विचार करायचा, सिंहाच्या भितीखालून सुटका कशी होईल असा उपाय शोधायचा, असं ठरलं.

बराच वेळ एकत्र बसून सगळे बोल बोल बोलले. पण कुणालाच धड उपाय सुचला नाही.

एक ससा फार हुशार डोक्याचा होता. त्याला काही बाही युक्त्या सुचायच्या. तो म्हणाला, "मला उपाय सुचलाय. सिंहाचा आवाज पावसाळी आभाळाच्या गडगडाटासारखा जोरदार होईल असं करायचं. सिंहानं तोंड उघडलं की चारी दिशांना लांबवर कळलं पाहिजे, *आला रे आला काळ!*"

सगळ्यांनी खुषीनं माना हलवल्या. फार छान उपाय आहे. पण हे व्हावं कसं? सिंहाचा आवाज मोठा करणार कोण? ह्या प्रश्नावर सशानं एक डोळा मिचकावला आणि तो थेट आपल्या कामगिरीवर सुटला.

डेरेदार झाडाच्या सावलीला सिंह विसावा घेत पडलेला सशाला आढळला. त्याच्या जवळ अदबीनं जाऊन ससा बोलला, "महाराज, आपल्यासारख्या थोरामोठ्यांना वाईट बातमी द्यायची म्हणजे अवघडच वाटतं. पण इलाज नाही, निरोप हा पोचवलाच पाहिजे. महाराज, आपला मोठा भाऊ फार आजारी आहे. 'असशील तसा नीघ आणि मला येऊन भेट' असा त्यांचा आपणाला निरोप आहे."

निरोप ऐकताच सिंह भलताच बेचैन झाला. सशाला म्हणाला, "कुठं आहे माझा भाऊ? वाट दाखवत तू पुढं हो. मी तुझ्या मागनं येतो. चल."

ससा टणाटण उड्या घेत पुढं, सिंह त्याच्या मागं, असे ते निघाले जंगलातल्या पायवाटेनं. सशानं सिंहाला चांगलं मैलोनमैल ताणलं. आधीच सिंहाची झोप अर्धवट झालेली. त्यात हा लांबचा तकाटा. सिंह दमला. पार भेंडाळला. धापा टाकत तो एका झाडाच्या सावलीत पसरला. डोळे मिटून पेंगता पेंगता गाढ झोपून गेला.

मग सशानं मधाड्या पाखराची मदत घेतली. हे पाखरू झाडावर लागलेलं मधाचं पोळं शोधून काढण्यात फार तरबेज होतं. त्यानं सशासाठी मधमाशाचं भलं मोठं पोळे शोधून काढलं. सगळ्या माशा मध गोळा करायला जंगलात गेल्या होत्या. पोळं मोकळं लोंबत होतं. जंगलच्या रिवाजाप्रमाणं पोवळ्यातल्या कांद्याचा चांगला मधानं ओथंबलेला तुकडा मधाड्याला खायला देऊन सशानं बाकीच्या भागातला मध घेतला. तो आणून सावलीला गाढ झोपलेल्या सिंहाच्या पंजाना, तोंडाला चोपडला, आपण धूम पळाला आणि जवळच जाळीत जाऊन लपून राहिला.

इकडं मध घेऊन सगळ्या माशा पोवळ्याकडं परतल्या. बघतात तर पोळे कुणी तरी पार लुटून फस्त केलेलं. त्या सगळ्या भयंकर संतापल्या. लुटारूची शोधाशोध दाही दिशांना सुरू झाली, आणि माशांना सिंहाचा पत्ता लागला. त्याच्या पंजांना, तोंडाला मध लागलेला बघून आग्या माशांचा घोळका घों घों करत सिंहावर कोसळला. आपल्या विषारी नांग्या मारून त्यांनी सिंहाच्या सगळ्या अंगाचा आगडोंब केला. सिंह वेदना असह्य होऊन ओरडायला लागला. ओरडता ओरडता त्याचा लहान आवाज मोठा होत होत आभाळाच्या गडगडासारखा भयंकर झाला. ओरडण्याच्या, विव्हळण्याच्या जंगल दणाणून टाकणाऱ्या गर्जना झाल्या.

सिंहाचा आवज कायमचा का बदलला ह्याची ही अशी कथा आहे.

"सशाचे फार फार उपकार झाले" असं सगळी जनावरं सारखं सारखं म्हणत राहिली. त्यांना आता लांबून सिंहाचं ओरडणं ऐकू येऊ लागले. सिंह दूर आहे तोवर जनावरं सावध होऊन आपला बचाव करून लागली.

# सिंह फळे का खात नाही

(हम्बाकुशू टोळीमधील कथा)

*ओकावांगो प्रदेशातील हम्बाकुशू टोळीमधील या कथेत, सिंह फळे का खात नाही (अतिशय तहानेने व्याकुळ झालेला असतानाचा अपवाद सोडून) हे सांगितलेले आहे.*

मब्वावा नावाच्या कोल्ह्याला एके दिवशी 'था' झाडाचे चवदार फळ सापडलं. सावलीत बसून कोल्हा फळ खाऊ लागला. तेवढ्यात सिंहाची गर्जना त्यानं ऐकली. कोल्हा मनात म्हणाला, "हा भुकेलेलाच आहे, इकडनंच नाही आला आणि माझ्या तोंडचा घास नाही घेतला म्हणजे मिळवली." अशा साशंक



मनानं घाईघाईनं तो फळे खाऊ लागला. सिंहाची भूक भली मोठी. शिवाय तो जंगलचा राजा. कोणाही प्राण्याच्या पुढ्यातला घास हिसकावून घ्यायचा अधिकारच त्याला मिळालेला होता.

सिंह आला तो कोल्ह्याच्याच बाजूला. जवळ येऊनही ठेपला. आपल्या पुढ्यातला 'था' झाडाच्या फळाचा घास सिंहानं हिसकावून घेऊ नये म्हणून धूर्त कोल्ह्यानं युक्ती लढवली. मब्वावा आधाशीपणानं भराभरा फळं खात राहिला. सिंह आपलं खाणं बघतो आहे हे त्याला माहीत होतं. मग एकाएकी मब्वावा खाली जमिनीवर कोसळला. कण्हला, कुंथला. त्याच्या सगळ्या अंगाचा आळापिळा झाला आणि तो शेवटी गप्पगार पडला. सिंह दुरून बघतच होता. त्याला वाटलं, हे फळ विषारी असेल. बापडा कोल्हा मेला.

आणि जवळ जाऊन बघण्याच्या भानगडीत न पडता सिंह आपल्या वाटेनं गेला. दिसेनासा झाला. मग मेल्यासारखा पडलेला मब्बावा उठून बसला. कोणा मेलेल्या कोल्ह्याची हाडं आपल्याला कुठं दिसली होती हे त्यानं आठवलं. कुठेतरी जवळपासच पडलेली कोल्ह्याची ती हाडं त्यानं गोळा करून आणली आणि ज्या झाडाखाली त्यानं मरून पडल्याचं सोंग वठवलं होतं त्या जागी टाकली. आपली सगळी बनवाबनवी ठीक झाली ह्याचं समाधान झाल्यावर तो आपल्या बिळाकडं गेला.

काही दिवसांनंतर सिंहानं त्या झाडाजवळून जाताना खाली पडलेल्या रसाळ फळांचा सडा पाहिला. तो झाडाखाली गेला आणि कोल्ह्याची हाडं बघताच जागीच थांबला. मेलेल्या मढ्यावर भूक भागविणाऱ्या कोणी प्राण्यांनी कोल्ह्याची हाडं चोहोकडं विखरून टाकली होती. कुणालाही बघताच कणव यावी असं ते दृश्य होतं.

सिंहाला मब्बावा कोल्ह्याची आठवण आली. ह्याच झाडाखाली, इथंच, विषारी फळ खाऊन कोसळताना आपण त्याला पाहिला होता. शप्पत! मी जन्मात कधी फळाला तोंड नाही लावणार आता!

आणि खरचं त्या दिवसापासून सिंहानं था झाडाच्या फळाला कधी तोंड नाही लावलं. था झाडाच्या फळाला नाहीच नाही, पण इतर कोणत्याही फळालासुद्धा नाही. कोल्हे आणि त्याच्यासारखे इतर लहान प्राणी फार आनंदले. आता सिंहाची भीती नव्हती. आनंदाने भरपूर फळे खायची. मजा करायची.

**सिंहाविषयी माहिती**

**जात :**

**सिंह *(Panthera leo)***

नर बहुधा एकटे रहातात.

माद्या घोळक्याने रहातात. ह्या घोळक्याला इंग्रजीत 'प्राइड' म्हणतात. त्यात बारापर्यंत माद्या असतात.



| | **नर** | **मादी** |
|---|---|---|
| उंची | 3 फूट 8 इंच | 3 फूट |
| वजन | 200 किलो | 130 किलो |
| जन्मल्यानंतरचे वजन | 1½किलो | 1½ किलो |
| आईला पिणे | 8 महिने | 8 महिने |
| वयात येणे | 4 वर्षे | 3 वर्षे |
| गाभण काळ | — | 3 ½ महिने |
| पिल्लांची संख्या | — | 2-5 |
| आयुष्य | 20 वर्षे | 20 वर्षे |

**जन्मस्थान :** डोंगर आणि जंगले वजा जाता सर्व प्रकारची राने.

**सवय :** सिंह एकट्याने किंवा जोडीने अथवा घोळक्याने शिकार करतो. गांजणूक झाली तर सिंह अंधार पडल्यावर शिकारीसाठी बाहेर पडतात. एरवी कडक उन्हे नसल्यावर दिवसा थंड वेळेला बाहेर पडून ते

शिकार करतात. दिवसा दहा वाजल्यापासून चार वाजेपर्यंत सावलीत विश्रांती घेतात. शिकारीसाठी घोळका जमतो. त्यात नर आणि माद्या एकत्र असतात. माद्या आडोशाने दबून बसतात आणि नर सावजाला उठवून माद्यांच्या बाजूला आणतात.

माणसांकडून उपद्रव झाला नाही तर सिंह क्वचितच धोकेबाज होतो, विशेषत: दिवसा उजेडी. स्वभावत: सिंह वृत्तीने चढेलच आहेत. फार चाणाक्ष असतात तसे हे बुजरेही असतात. आता बरे असतात ते दुसऱ्या क्षणी बदलून बिघडतात. भरवसा नसतो.

घोळक्याने रहाणारे मार्जार वर्गातील सिंह हे एकमेव जनावर आहे. माद्या, त्यांची लहान पिल्ले, मोठी पिल्ले आणि घोळक्याचा प्रमुख असा एक नर अशांचा मिळून हा घोळका होतो.

माद्या कायम ह्याच घोळक्यातच रहातात. नर रहात नाहीत. सर्वांत मोठा आणि सामर्थ्यवान सिंह घोळक्याचा प्रमुख असतो. वाढत्या वयाच्या नरांचा त्याला सदा संशयच असतो. त्यातला कोणी आपल्याशी स्पर्धा करण्याइतपत सामर्थ्यवान तर होत नाही ना? ह्या गोष्टीवर सतत लक्ष ठेवून तो त्या वाटेनं वाढता दिसणाऱ्या सिंहाला घोळक्याबाहेर हाकून लावतो. हा प्रकार दिसायला क्रूर दिसतो, पण हा निसर्गाचा कायदाच आहे. घोळक्यातील माद्यांना सशक्त पिल्लेच व्हावीत, ती पुढे बलाढ्य शिकारी व्हावीत, अशीच निसर्गाची योजना असते.

लहान वयात सिंहाना घोळक्यातून बाहेर घालवून दिल्यावर ते एकटे राहतात. किंवा अशा, एकट्यांचा एक लहान घोळका करून रहातात. रानातले जिणे शिकतात. शिकार कशी मिळवावी हे शिकतात. त्यातला सामर्थ्यवान आणि उत्तम शिकारी झालेला सिंह स्वत:चा घोळका जमवून त्यांचा प्रमुख होतो.

रोज संध्याकाळी सिंह पाण्यावर जातात आणि पाणी पितात. पण बराच काळ पाऊस झाला नाही, चोहीकडे पाणी आटले तर ते पाण्याशिवाय रहातात. इतर जनावरे तहान भागविण्यासाठी जशी रानटी खरबुजे, वाळूक खातात तशी सिंहही खातात.

**अन्न :** सिंह मांस खाणारे आहेत. ते रानम्हशी, मोठी हरणे, झेब्रे, शहामृग, रानडुकरे, कधीमधी जिराफ आणि हत्तीची लहान पिल्ले यांची शिकार करतात. जेव्हा फार भुकेलेले असतात तेव्हा लहान जनावरे आणि माणूससुद्धा खातात. मात्र माणूस खाणे फार क्वचितच घडते. रानातली जनावरे मिळेनाशी होतात तेव्हा माणसांनी पाळलेली गुरेढोरे मारून खातात.

**पिल्ले :** सिंहाच्या माद्यांना ठराविक मोसमांत पिल्ले होतात असे नाही. वर्षातल्या सर्व महिन्यात माद्यांना वेते होत असतात. एका वेतात दोन ते चार पिल्ले होतात. तर सिंहांना पिल्ले दिसू नयेत म्हणून माद्या त्यांना लपवून वाढवतात. पिल्ले लहान असतात तेव्हा त्यांच्या आया घोळक्यात शिकार करायला जातात. पण मध्येच पिल्लांना पाजायलाही येतात. पिल्ले थोडी कळती झाली की दोघीतिघी सिंहीणी त्यांना संभाळण्यासाठी रहातात.

नर सिंह अनेक सिंहीणींशी जुगतो. अनेक माद्यांना एका सिंहापासून पिल्ले होतात. कधी कधी दोन नर एका मादीशी जुगतात. पण दोघांपैकी जो दांडगा व जास्त ताकदवान असतो तो दुसऱ्याला पळवून लावतो.



# कादिमा सशाचा भयंकर गुन्हा

(हम्बाकुशू टोळीमधील कथा)

कोणे एके काळी कादिमा नावाच्या एका सशानं 'न्थू' नावाच्या बिबळ्या वाघिणीशी एक करार केला. वाघीण शिकारीसाठी बाहेर गेल्यावर सशानं वाघिणीच्या तीन पिल्लांना सांभाळायचं आणि ह्या कामाचा मोबदला म्हणून वाघिणीनं आपण मारलेल्या शिकारीतला वाटा संध्याकाळच्या जेवणासाठी सशाला द्यायचा, असे ठरले.

कठीण काळ येईपर्यंत, म्हणजे मोठा दुष्काळ येईपर्यंत, हा करार उत्तम पाळला गेला. पुढे, वाघीण मारून खायची ते प्राणी पिण्याचं पाणी शोधत दुसऱ्या भागात निघून गेले. वाघीण, तिची तीन पिल्लं, आणि कादिमा ससा ह्यांना वाईट दिवस आले. रोज सकाळी वाघीण बाहेर पडायची आणि काहीही शिकार न मिळता संध्याकाळी परत यायची. पिल्लांना खायला मिळेना. ती अंगानं वाळू लागली.

एके दिवशी न्थू वाघीण आपल्या घराकडं आली आणि बघते तर कादिमा खात बसला आहे. वाघिणीनं विचारलं, "काय रे, मी एवढी उत्तम शिकार करणारी. मला नाही शिकार मिळत. तुला बरी मिळाली."

ससा म्हणाला, "एक लहान हरीण चुकून आपल्या गुहेपाशी आलं. मी ते धरलं आणि मारलं."

हे त्यानं साफ खोटं सांगितलं. खरं म्हणजे त्यानं वाघिणीच्या तीन पिल्लांपैकी एक मारलं होतं. ते तो खात होता.

दुसऱ्या दिवशी शिकारीसाठी वाघीण पुन्हा जंगलात गेली. दुष्ट सशानं तिचं दुसरं पिल्लू मारलं आणि खाऊन टाकलं. संध्याकाळी वाघीण रिकाम्या हातानं गुहेकडं आली. दमून भागून बसली आणि सशाला तिनं पिल्लं आणायला सांगितली. तिला त्यांना पाजायचं होतं. सशानं एकच पिल्लू पुन्हा पुन्हा तीन वेळा आणून वाघिणीपुढे ठेवलं. आणि वाघिणीला वाटलं, आपली तिन्हीही बाळं आपण पाजली. ती छान तरतरीत आहेत.

तिसऱ्या दिवशी न्थू वाघीण शिकारीला बाहेर पडल्यावर कादिमा सशाला भुकेने राहवेनासं झालं. शेवटी त्यानं तिचं शेवटचं पिल्लूही मारून खाल्लं. आपला गुन्हा झाकण्यासाठी त्यानं बाहेरनं गुहेकडं आणि गुहेतनं बाहेर सावज गेल्याच्या खुणा तयार केल्या. जागोजागी गवत खरवडलं, झुडूपाच्या डहाळ्या मोडल्या. जणू काही ह्या जागी एक मोठी झटापट होऊन गेली आहे.

एवढे केल्यावर आटून कोरडा पडलेल्या झऱ्यावर ससा गेला. कावेच्या रंगानं त्यानं आपलं अंग रंगवून घेतलं.

न्थू वाघीण शिकारीवरून परत येताच कादिमा रडत घडपडत तिला सामोरा गेला. नुकतंच काय घडलं हे तो तिला तिखट मीठ लावून सांगू लागला. वाघिणीची पिल्ले शिकारी लोकांनी खाण्यासाठी पळवून नेली. कादिमानं त्यांच्याशी झटापट केली. पण शिकाऱ्यांनी त्याला बडवून, मारून धुडकावून लावलं. असं सांगून सशानं आपल्या अंगावरचे रक्ताचे डाग दाखवले.

बिचारी न्थू! दुःखानं ओरडून तिनं जंगल दणाणून सोडलं. जवळच्या ठिकाणी कुंपणाआत वसलेल्या झोपड्यांच्या दिशेने ती रागानं वेडी होऊन गेली. आपल्या तिन्ही पिल्लांना मारणाऱ्या लोकांचा तिला सूड घ्यायचा होता.

रानात गुरं चारणाऱ्या पोरांवर वाघीण झेप घेणार तोच तिला झाडाच्या शेंड्यावरून कोणीतरी हाक दिली, "न्थू."

रानात हेरगिरी करणारा हा पक्षी होता. तो ओरडून म्हणाला, "न्थू, दुष्ट कादिमानं तुझी पिल्लं मारून खाल्लीत. खेड्यातल्या चांगल्या लोकांनी न्हाई."

हे ऐकताच वाघीण सशाला शोधण्यासाठी पुन्हा जंगलाकडं वळली. पण कादिमानं पक्षाचं ओरडणं ऐकलं होतं. विलक्षण भयानं तो दूर पळून गेला होता.



हम्बाकुशू लोक सांगतात की, वाघीण आजही सशाच्या शोधात आहे.

म्हणून आज आपल्याला वाघीण दमगीर दिसते, एकटीच सावज शोधत असते. आणि ससा कधी अचानक तुम्हाला दिसला की तत्काळ जीव घेऊन पळतो, मागं वळूनसुद्धा बघत नाही.

# बिबळ्या आपले भक्ष्य झाडावर का लपवून ठेवतो

(न्डबीलि जमातीमधील कथा)

न्डबीलि लोक आपल्या मुलांना गोष्ट सांगतात. पूर्वीच्या काळी तीन मित्र होते. एक सुरेख बिबळ्या वाघ, एक कोल्हा आणिं एक तरस. ते संगतीनं रहात. संगतीनं हिंडत. कधी बिबळ्यानं शिकार केली तर त्या शिकारीतला निवडक भाग तो कोल्ह्याला, तरसाला ठेवून देई. त्यांना नको का चविष्ट मांस खायला?

एकदा बिबळ्या आजारी पडला. त्याला शिकारीला जाता नाही आलं. तो कोल्ह्याला म्हणाला. "मित्रा, तू आज शिकारीला जा आणि माझ्यासाठी, तरसासाठी काहीतरी मारून आण."

आळशी कोल्हा म्हणाला, "मी भयंकर दमलोय. तरसाला सांग."

मग बिबळ्या तरसाला म्हणाला, "मित्रा, आज मला बरं नाही. तू शिकार करून काही तरी आण."

कोल्ह्याप्रमाणं तरसानंही सबब सांगितली, "गेलो असतो, पण माझा पाय लचकलाय. धड चालायला नाही येत. मग शिकार लांबच."

हे ऐकून बिबळ्या रागानं गरजला, "मला वाटलं होतं तुम्ही माझे मित्र आहात. पण तुमचा काही उपयोग नाही. खायला आधी, कामाला कधीमधी असे आहात तुम्ही. ऐदी कुठले! इथून पुढं, शिकार केली तरी मी तुम्हाला त्यातलं शेपूटसुद्धा नाही ठेवणार. खाऊन राहिलेली माझी शिकार मी झाडावर अडकवून ठेवीन. तुम्हापैकी एकालासुद्धा झाडावर चढायला नाही येत."

बोललेला शब्द बिबळ्यानं खरा केला. त्या दिवसापासून त्यानं कधीही आपल्या स्वार्थी मित्रांसाठी शिकारीतील मांस ठेवलं नाही.

शिकार केल्यावर बिबळ्या ती उंच झाडावर नेऊन ठेवू लागला. कोल्हा आणि तरस हे सडलेलं मांस खाऊ लागले, इतरांनी शिकार खाऊन उरलेलं उष्टं खरकटं खाऊ लागले.

बिबळ्याच्या मैत्रीचा दिवस हा सर्वांत वाईट दिवस म्हणून त्यांच्या आठवणीत राहिला.

**बिबळ्याविषयी माहिती**

**जात :**

**बिबळ्या उर्फ बिबट्या** ***(Panthera pardus)***

एकटा रहात असतो.



| | नर | मादी |
|---|---|---|
| उंची | 2 फूट 6 इंच | 2 फूट 4 इंच |
| वजन | 70 किलो | 60 किलो |
| जन्मल्यानंतरचे वजन | ½किलो | ½ किलो |
| आईला पिणे | 3 महिने | 3 महिने |
| वयात येणे | 2 वर्षे | 2 वर्षे |
| गाभण काळ | — | 3 महिने |
| पिल्लांची संख्या | — | 2-3 |
| आयुष्य | 15 वर्षे | 15 वर्षे |

**ओळख :** बिबट्या आणि चित्ता एकच नव्हेत. बिबट्या अंगाने भारी असतो. त्याचे पाय चित्त्यापेक्षा लांबीने कमी असतात. त्याची शक्तीही जास्ती असते. दोघांच्या अंगावर असलेल्या ठिपक्यांतही फरक असतो. बिबट्याचे काळे ठिपके सर्वांगावर असतात, गर्दीने असतात. त्यांचा आकार गुलाब फुलाच्या आकाराच्या दागिन्यांसारखा दिसतो. चित्त्याचे असे नसते.

बिबट्याच्या अंगावरचे कातडे दाट, केसाळ, पिवळ्या वाळूसारख्या रंगाचे असते. तर गळ्यापाशी, पायांच्या आतील बाजूला, पोटाच्या खाली ते स्वच्छ पांढरे असते. ठिपके काळे असतात.

उंच डोंगरात रहाणारे बिबटे रंगाने काळेही असतात.

**जन्मस्थान :** उंच डोंगर, खडकाळ प्रदेश, जंगल, गवताळ कुरणे, अर्धेमुर्धे वाळवंट, अशा नाना प्रकारच्या प्रदेशात बिबट्या राहतो.

**सवयी :** सावध बुद्धीचा, शक्कलबाज, रात्री बाहेर पडणारा असल्यामुळे बिबट्या दिवसाउजेडी क्वचितच दिसतो. एकटा रहातो, एकट्यानेच शिकार करतो. जुगण्याच्या मोसमात नर मादी जोडीने हिंडतात. दिवसा उजेडी बिबटे झाडावर, दाट झुडूपात, जाळीत, गुहेत, खबदाडीत लपून असतात. कधीमधी चामखिळ्या रानडुकराच्या बिळातही ते दडून बसतात.

शिकार करताना बिबटे जनावराच्या वाटेवर नजर ठेवून झाडाच्या फांदीवर गप्प पडून रहातात आणि जनावर येताना दिसले की नख्या फिस्कारून बेसावध जनावराच्या पाठीवर उडी घेतात.

मार्जार कुळातील प्राण्यांना आपल्या नख्या पंजात दडवता येतात.

**अन्न :** इम्पाला जातीचे काळवीट हे बिबट्याचे प्रमुख भक्ष्य असते, पण इतरही बरेच असते. उदाहरणार्थ, कीटक, मासे, बेडके, तरस, कुत्री, बॅबून माकडे. त्यात बॅबून माकडे हे त्याच्या आवडीचे भक्ष्य आहे.

**विण्याचा मोसम :** ठराविक असा काही मोसम नसतो. बहुतेक वेळा बिबट्या मादीला दोन किंवा तीन पिल्ले होतात. क्वचित सहाही होतात.



# चित्ता वेगवान पळणारा कसा झाला

(बुशमन लोकांमधील कथा)

एकवार निर्मात्याच्या मनात आले की सगळ्या प्राण्यांत वेगाने पळणाऱ्या प्राण्याची निवड केली पाहिजे. मग त्याने त्सेसिबी आणि चित्ता ह्या दोघांची शर्यत लावली. त्सेसिबी जातीचं हरण अतिशय वेगवान पळणारं होतं. त्यावेळी चित्त्याचे पंजे मऊच होते. हे काही पळण्याच्या कामाचे नाहीत हे चित्त्याच्या ध्यानी आले. त्याने रानकुत्र्याचे पंजे उसने घेतले.



एका उंच गोरख चिंचेपासून शर्यत सुरू झाली. निर्माता स्वतःच शर्यतीचा प्रमुख होता. गोरख चिंचेपासून दूरवरच्या टेकडीपर्यंत सपाट रान होतं. निर्मात्याने "जा" असा इशारा दिला आणि दोघा खेळाडूंनी दौड सुरू केली.

लवकरच त्सेसिबी हरण चित्त्याच्या पुढं गेलं. अर्ध रान संपलं तेव्हाही त्सेसिबीच पुढं होतं. तेच जिंकणार असं ठरलं आणि अचानक अपघात झाला. दगडाला अडखळून त्सेसिबी खाली कोसळलं. त्याचा पाय मोडला. आता शर्यत चित्त्याच्या हातात होती. पण चांगल्या स्वभावाचा चित्ता पळाला नाही पुढं. तो थांबला. हरणाला मदत करायला पुढं झाला. पुढं पळून शर्यतीत पहिला नंबर मिळवण्याऐवजी ह्या घडीला त्सेसिबी हरणाला मदत करणं जास्ती महत्त्वाचं आहे असं त्याला वाटलं.

चित्त्याचं हे वागणं बघून सृष्टीचा निर्माता फारच खूष झाला. त्यानं चित्त्याला जमिनीवरचा सर्वांत वेगवान प्राणी केलं. ह्या बक्षिसाबरोबर रानकुत्र्याचे पंजे कायमचे ठेवून घेण्याची परवानगीही त्यानं चित्त्याला दिली.

# चित्त्याच्या गालांवर ओघळणाऱ्या अश्रूंचे डाग कसे आले

(झुलू लोकांमधील कथा)

कोणे एके काळी एक दुष्ट आणि आळशी शिकारी झाडाच्या सावलीला बसला असताना-त्यानं एक हरणाचा कळप शांतपणे चरताना पाहिला. खालच्या भागातील झाडं तोडून मोकळ्या झालेल्या गवताळ रानात हा कळप होता. शिकारी मनाशी म्हणाला, "ह्या असल्या उन्हाच्या सणाक्यात, दडत, रांगत, एवढ्या लांबवर जाऊन हरणाची शिकार करण्यात काही तथ्य नाही. फारच कष्ट पडतील."

असं तो मनाशी म्हणतोय तोवर त्याला उजव्या बाजूला झाडीत हालचाल झालेली दिसली. नीट न्याहाळून बघताच ह्याच कळपाच्या मागावर जाणारी एक चित्त्याची मादी त्याला दिसली. दबतदबत ती कळपाच्या दिशेनं जात होती. अगदी पद्धतशीर अशी तिची शिकार चालू होती. कळपाकडून वारा तिच्या दिशेला वहाता होता. अगदी सावकाश अशी ती कळपावर जात होती. झुडूपाची दडण घेत, इंचाइंचानं ती अंतर कापत होती. शिकारी चकीत दृष्टीनं पहात होता. कळपातलं एक हरीण अडाणीपणा करून एकटंच चरत चरत बाजूला घसरलं होतं. चित्तीण त्याच्यावर नजर ठेवून पुढं सरकत होती.

एकदम आपले पुढचे लांब पाय तिनं पोटाकडं दुमडले आणि धनुष्यातला तीर सणसणावा तशी झेप घेतली. बघून थक्क व्हावं अशा गतीनं हरणावर जाऊन तिनं त्याला पकडलं. हरणाला उडी घेऊन पळता आलचं नाही.



धापा टाकत चित्तिणीनं आपली शिकार ओढत ओढत गवताळ रानाच्या कडेला झाडाच्या सावलीत आणली. शिकारी बघत होता. आत्ता दिसलेला तिचा वेग आणि कौशल्य ह्याचं तो आश्चर्य करत होता. तेवढ्यात त्याच्या लक्षात आलं की झाडाच्या सावलीत चित्तिणीची तीन पिल्लंही आहेत. आई शिकार करून कधी आणतेय ह्याची वाट बघताहेत. आळशी शिकाऱ्याला त्या पिल्लांचा फार इसाळ वाटला. त्याच्या मनात आलं की, आपल्याला असं निष्णात शिकारी असणारं कोणी असतं तर केवढी बहार होती.

मग आळशी शिकाऱ्याच्या डोक्यात एक वाईट गोष्ट आली. चित्ता माणसाला कधी मारत नाही हे त्याला ठाउक होतं. ह्या पिल्लांपैकी एक आपण उचलून नेऊ आणि त्याला पाळू, आपल्यासाठी शिकार करायला शिकवू.

पिल्लं पळवण्यासाठी संधीची वाट बघत तो तिथंच थांबला. दिवस मावळायच्या वेळेला चित्तिणीनं आपली पिल्लं झुडूपात दडवून ठेवली आणि स्वतः ती पाणी पिण्यासाठी झऱ्यावर गेली.

शिकारी माणसानं आपला भाला सावरला आणि पळत पळत तो पिल्लं दडवलेल्या झुडूपापाशी गेला. त्याला ती तीन पिल्लं दिसली. पळून जाण्याएवढी ती मोठी झाली नव्हती. ह्या तिन्हीतलं कोणतं पिल्लू न्यावं हे शिकाऱ्याला कळेना. त्यानं तिन्ही पिल्लं उचलली व म्हणाला, "एकापेक्षा तीन अधिक बरी."

पिल्लांची आई एका घंट्यानं परत आली. बघते तर बाळं नाहीत.

तिच्या काळजानं ठाव सोडला. बापडी रडरड रडली. एक रात्र, एक दिवस रडली. डोळ्यांतलं पाणी गालांवर गळून दोन्ही गालांवर डाग पडले. तिच्या रडण्याचा आवाज मोठा होता. तो ऐकून एक म्हातारा माणूस काय झालं हे बघायला आला.

हा आलेला माणूस फार शहाणा होता. जंगलातल्या प्राण्याबद्दल त्याला उत्तम माहिती होती. शिवाय त्याला प्राण्यांबद्दल मोठा आदरही होता. काय झालं हे कळल्यावर त्याला फार राग आला. तो आळशी शिकारी हा चोर तर होताच, पण त्यानं टोळीची वहिवाटही धुडकावून लावण्याचा गुन्हा केला होता.

शिकाऱ्यानं शिकार करताना फक्त आपलं कौशल्य आणि बळ वापरलं पाहिजे. ह्यापेक्षा वेगळ्या पद्धतीनं शिकार करणं म्हणजे वहिवाटीचा अनादरच.

तो शहाणा माणूस खेड्याकडं आला. सगळ्या जाणत्या गावकऱ्यांना त्यानं ही हकिगत सांगितली. गावकरी फार संतापले. त्यांनी आळशी शिकाऱ्याला धरला आणि आपल्या खेड्याबाहेर कायमचा हाकलून दिला.

मग त्या शहाण्या म्हाताऱ्यानं चित्तिणीची तिन्ही पिल्लं घेतली आणि आईला परत दिली. पण अतोनात रडण्यामुळं चित्तिणीचे गाल डागाळून गेले ते कायमचेच.

झुलू लोक सांगतात, वहिवाट सोडून इतर वाटांनी शिकार करणं योग्य नाही हे कळावं म्हणून चित्त्याच्या दोन्ही गालांवर आजही अश्रूंच्या खुणा दिसतात.

**चित्त्याविषयी माहिती**

**जात :**

**चित्ता *(Acinonyx jubatus)***

***नाहीसा होत चाललेला प्राणी***

| | नर | मादी |
|---|---|---|
| उंची | 2 फूट 6 इंच | 2 फूट 6 इंच |
| वजन | 60 किलो | 55 किलो |
| जन्मल्यानंतरचे वजन | 300 ग्रॅम | 300 ग्रॅम |
| आईला पिणे | 3 महिने | 3 महिने |
| वयात येणे | 2 वर्षे | 2 वर्षे |
| गाभण काळ | — | 3 महिने |
| पिल्लांची संख्या | — | 2-4 |
| आयुष्य | 10 वर्षे | 10 वर्षे |



**ओळख :** चित्त्याची लांबी बिबट्याएवढीच असली तरी बिबट्यापेक्षा तो वजनाने हलका असतो. त्याचे पाय लांबीने जास्ती असतात. चित्त्याच्या कातडीवर काळे गडद ठिपके वेगवेगळे दिसतात. बिबट्याप्रमाणे एकमेकांना चिकटून पुंजक्यासारखे दिसणारे ते नसतात. चित्त्याच्या शरीराची रचना ही थोडके अंतरसुद्धा वेगाने पार करण्याजोगी असते. अन् तो दिसतोही धावपटूसारखा.

ह्याची कातडी बिबट्याच्याच रंगाची असते. वरून गडद पिवळसर वाळूसारखी, तर पोटाखाली आणि पायाच्या आतल्या बाजूंना शुभ्र पांढरी. काळे ठिपके सगळ्या अंगावर असतात. डोक्यावर, पायांवर, शेपटीच्या शेवटच्या टोकाकडे मात्र काळी कडी असतात.

**जन्मस्थान :** चित्ता सामान्यतः उघड्या रानात रहातो. फार क्वचित घनदाट जंगलात दिसतो.

**सवयी :** सर्व प्राण्यांत वेगाने पळणारा प्राणी म्हणजे चित्ता. हा एका तासात 100 किलोमीटर ( ताशी 62 मैल) अशा वेगाने धावतो. चित्त्याच्या पंजाला असलेली कुत्र्यासारखी नखे त्याला वेगाने पळण्यासाठी कामाला येतात. कारण नखांमुळे त्याला जमिनीवर पकड घेता येते. खिळे असलेले पळण्याचे बूट घातल्यावर आपल्यालाही जशी पकड मिळते तशीच.

हा पळण्याचा वेग थोडे अंतर काटून जाईपर्यंतच टिकतो. तीनशेसाठ फुटांनंतर तो रहात नाही. सुरुवातीस दबून दबून सावकाश जात पुढे ह्या वेगाचा वापर करून चित्ता सावज पकडतो. वाऱ्याबरोबर सावजाला आपला वास आला आहे असे त्याला कळले तर मात्र सावजाचा नाद सोडून पाठलाग थांबवून त्याला दुसरी शिकार शोधावी लागते.

सावजाचे नरडे धरून चित्ता त्याला खाली पाडतो आणि मारतो. मारलेल्या सावजाच्या मांसाचे मोठमोठे घास भराभरा खाऊन टाकतो. ही घाई बहुदा इतर श्वापदांनी आपली शिकार पळवू नये म्हणून असावी. आपण केलेली शिकार दुसऱ्या श्वापदाकडून खाल्ली जाऊ नये म्हणून चित्ता फार प्रयत्न करीत नाही. ह्या भित्र्या स्वभावामुळे त्याने मारलेले सावज सिंह, तरस, गिधाडे फस्त करतात. अन्नासाठी होणाऱ्या ह्या चढाओढीचा परिणाम म्हणून पिल्ले आणि तरुण चित्ते यांच्या मृत्यूसंख्येचे प्रमाण चढते रहाते.

चित्ते एकटे रहातात. एकवार पिल्ले जाणती झाली की चित्त्याचे कुटूंब मोडते.

**अन्न :** इम्पालासारखे मध्यम आकाराचे हरीण हे सामान्यतः चित्त्याचे अन्न असते. पण चामखिळ्या रानडुक्कर, रानकोंबड्या, ससे आणि शहामृग ह्यांचीही शिकार तो खाण्यासाठी करतो.

चित्त्याची मादी दोन किंवा तीन पिल्लांना जन्म देते. लांब केसांची, रुपेरी रंगाची केसाळ अंगे असल्यामुळे ही पिल्ले फार देखणी दिसतात. मार्जार जातीच्या प्राण्यांकडून पिल्लांना हाक देण्याच्या पद्धतीपेक्षा चित्त्याच्या मादीची पद्धत अगदी वेगळी आहे. एखाद्या पाखराने उंच शीळ द्यावी तशी शीळ ठोकून ती पिल्लांना हाक देते.



# रानकुत्रे सूड घेतात

(न्डबीलि जमातीमधील कथा)

कोणे एके काळी रानकुत्रा एक फार सुखी प्राणी होता. त्याच्या मालकीचं एक उत्तम रहातं बीळ होतं. त्याची बायको फार चांगली होती आणि त्याला पुष्कळ पोरं होती.

जंगलातले सगळे प्राणी रानकुत्र्याला फार मानायचे. एकदा त्याची बायको आजारली तेव्हा कोल्होबा काकांना फार काळजी वाटली. कोल्ह्यानं रानकुत्र्याला सशाकडे नेलं. सशाला कोणत्या आजारात काय औषध लागू पडतं ह्याची माहिती होती. तो भरवशाचा देवऋषी होता.

सशानं मंतरलेले हाडाचे फासे टाकले आणि भविष्य सांगितलं, "रानकुत्र्याची बायको गंभीररित्या आजारी आहे आणि हा आजार इथून पुढं वाढतच जाईल. ती बरी होईल असा दवा आपल्यापाशी आहे. पण रानकुत्र्यानं किंवा कोल्ह्यानं त्याला शिवायचं नाही. त्यांनी परत जाऊन आजाऱ्याची सेवा करावी. दवा त्याच्या बिळावर पाठवण्याची व्यवस्था मी करेन."

सशानं सर्व सकाळ दवा तयार करण्यात घालवली. दवा तयार झाल्यावर त्यानं लहान जातीच्या काळविटाला बोलावलं. वाळलेला रानभोपळा कोरून केलेल्या बुधल्यात दवा घालून सशानं तो काळविटालाच्या पाठीवर लादला आणि सांगितलं, "धावत जा आणि हा दवा रानकुत्र्याच्या बिळावर नेऊन दे. मात्र काहीही झालं तरी वळून मागं बघू नकोस. दव्यातला गुण निघून जाईल त्यानं."

काळवीट सुटलं. वाटेत त्याला आपल्या मागं झाडंझुडूपं मोडल्याचा आवाज आला त्यासरशी त्यानं मागं वळून बघितलं आणि पाठीवरचा बुधला लवंडून सगळा दवा भुईवर सांडला. काळविटानं परत येऊन सांगितलेली रडकथा ऐकून ससा निराश झाला.

पण त्यानं पुन्हा कष्ट करून दवा तयार केला. काळविटाला बाद करून इम्पाला जातीच्या काळविटाला दवा घेऊन पाठवलं. त्यालाही थोडक्यात सूचना दिली, "मागं वळून बघू नकोस."

इम्पाला निघाला. अर्धाअधिक वाट तुडवून गेला आणि मधेच त्याला सिंहाचा वास आला. चमकून त्यानं मागं वळून पाहिलं आणि धडाम्! बुधला खाली दगडावर आदळून त्याच्या ठिकऱ्या उडाल्या.

सशानं तिसऱ्यांदा दवा तयार केला. तेव्हा झेब्रा पुढं आला व म्हणाला, "मी नेतो बुधला, माझ्यापाशी ताकद आहे आणि मी तसा घट्टही आहे."

मग झेब्रा चौखूर निघाला. दोन वेळा त्यानं आपल्या मागे काही भीतिदायक आवाज झाल्याचं ऐकले. पण सशाचा इशारा आठवून त्यानं त्या आवाजाकडं धीटपणे दुर्लक्ष केलं.

झेब्र्यानं दव्याचा बुधला जवळजवळ रानकुत्र्याच्या बिळानजिक नेला होता. पण तेवढ्यात त्याच्या पुढच्या पायाशीच एक नाग फडा काढून उभा राहिला. त्यानं फूत्कार केला. त्यासरशी हा आता चावा घेणार ह्या भीतीनं झेब्र्यानं टाणूदिशी उडी घेऊन, लाथा झाडल्या. सशानं दिलेला इषारा लक्षात यायच्या आधीच झेब्र्याची घबराट झाली. तो माघारी वळला आणि थेट आपल्या घराकडे धावला. ह्या धांदलीत पाठीवर लादलेला औषधाचा बुधला खाली जमिनीवर आदळला आणि त्याच्या ठिकऱ्या उडाल्या. ह्याच वेळी रानकुत्र्याच्या बिळाकडून दुःखाचं रडणं, ओरडणं-भेकणं झेब्र्याला ऐकू आलं. रानकुत्र्याची आजारी बायको औषधाची वाट बघून बघून अखेरीला आटोपली होती.

रानकुत्रा ह्या घटनेनं एवढा बिथरला की त्यानं आपल्या नातेवाईकांना, मित्रांना हाका दिल्या. ते सगळे एकत्र जमले आणि त्यांनी अनेक मैल झेब्र्याचा पाठलाग केला. शेवटी झेब्रा सापडला आणि रानकुत्र्याच्या टोळीनं त्याच्या शरीराच्या फाडून चिंध्या केल्या.

ह्या घटनपासून, रानकुत्रे टोळीनं शिकार करतात. झेब्रा आणि इम्पाला काळवीट ह्या प्राण्यांवर रानकुत्र्यांची टोळी नेहमी तुटून पडते. सशानं पाठविलेल्या दवादारूचा उपयोग होऊन रानकुत्र्याची लाडकी बायको मरणाच्या दाढेखालून वाचली असती. झेब्रा आणि इम्पाला काळवीट ह्यांच्यापायी ती गमावली, ही गोष्ट ते अद्याप विसरलेले नाहीत.



**रानकुत्र्याविषयी माहिती**

**जात : रानकुत्रा *(Lycaon pictus)***

कळपाने रहाणारा. कळप मोठा असतो. एका कळपात जास्तीतजास्त तीसजण असतात.

***नाहीशी होण्याच्या वाटेवर असलेली जात.***



| | **नर** | **मादी** |
|---|---|---|
| उंची | 2 फूट 2 इंच | 2 फूट 2 इंच |
| वजन | 30 किलो | 25 किलो |
| जन्मल्यानंतरचे वजन | ½ किलो | ½ किलो |
| आईला पिणे | 3 महिने | 3 महिने |
| वयात येणे | 12 महिने | 8 महिने |
| गाभण काळ | — | 2 महिने |
| पिल्लांची संख्या | — | 2-8 |
| आयुष्य | 10 वर्षे | 10 वर्षे |

**ओळख :** मोठे, ताठ, तोंडे समोर असणारे, गोलाकार कान हे रानकुत्र्यांची ओळख पटण्यासारखी प्रमुख चिन्ह आहे. ह्या कुत्र्यांच्या अंगावरचे केस हे वेगवेगळ्या रंगाचे असतात. दोन कुत्र्यांचा रंग एकसारखा नसतो. पण सगळ्या कुत्र्यांची मुस्कटे ही गर्द हुरमुजी रंगाची, किंवा काळ्या रंगाची असतात. तोंडाचा खालचा भाग तशाच रंगाचा असतो. शेपटाच्या टोकाशी पांढऱ्या रंगाचे केस असतात.

**जन्मस्थान :** रानकुत्री गवताळ आणि उघड्या कुरणात हिंडतात. शिकार करतात.

**सवयी :** जास्तीत जास्त तीस कुत्री एका कळपात असतात. त्यांच्यात चांगली सामाजिक शिस्त असते, एकोपा असतो. सर्व कळप जेव्हा शिकारीसाठी बाहेर पडतो तेव्हा लहान पिल्लांना सांभाळण्यासाठी एखाद दुसरं कुटुंब मागे रहाते.

कळपात जे वयाने म्हातारे असतील, आजारी असतील, ज्या माद्या गाभण राहिलेल्या असतील त्यांची इतर कुत्री काळजी घेतात. म्हाताऱ्यांची आणि आजाऱ्यांची काळजी घेणे हा प्रकार जनावरांच्या जगात इतरत्र कुठेही नाही.

ह्या कळपाची शिकार करण्याची पद्धतही वैशिष्ट्यपूर्ण अशी आहे. प्रथम जनावरांच्या कळपातले एखादे आजारी किंवा अपंग जनावर हेरून दोन तीन रानकुत्री त्याचा जोराने पाठलाग सुरू करतात. बाकीचे मागावर रहातात. पाठलाग करणारी एक दोन कुत्री दमली की त्यांची जागा मागावर असणारे तीन तरतरीत कुत्री घेतात. पाठलाग सुरूच रहातो. शेवटी जनावर शिकाऱ्यांना मिळतेच.

**अन्न :** रानकुत्री झेब्र्यासारख्या मोठ्या जनावरांपासून लहान काळविटापर्यंत विविध प्राण्यांची शिकार करतात. कधीमधी ती पाळलेली गुरेढोरेसुद्धा मारतात. शिकारीची त्यांची पद्धत बघून माणूस त्यांना 'मारेकरी' म्हणून ओळखतो. प्रत्यक्षात, आजारी जनावरांचा आजार इतर जनावरांत पसरण्याअगोदर त्यांना मारून ही कुत्री एक आवश्यक असे कामच पार पाडीत असतात.

**वेत :** बऱ्याच गाभण माद्या एकत्र येऊन, मुंगीखाऊ प्राण्याने सोडून दिलेल्या बिळात किंवा तसल्याच इतर बिळात त्या आपली पिल्ले घालतात.



# आधाशी तरस

(शोना लोकांमधील कथा)

तरस एके दिवशी शिकार मिळवायच्या इराद्यानं बाहेर पडले. उन्हाळ्याचे दिवस. जनावर नजरेला पडत नव्हतं. तरसानं बरेच दिवस पोटभर खाल्लेलं नव्हतं. ते भुकेनं हडाडलं होतं.

बरीच शोधाशोध केल्यावर अचानक एक इम्पाला मादी आणि तिचं लहान पाडस तरसानं बघितलं. उंच गवताच्या डुंब्याआड लपून वाकून पहाताना तरसाच्या मनात आलं, "हे पाडस काय चवदार लागेल!" तरसाच्या तोंडाला पाणी सुटलं. पोटात सुरेखसा आवाज होऊ लागला.

मनातल्या मनात तरस म्हणाला, "ही पाडसाची आई फार अडचणीची होणार आपल्याला. इंपाला मादी आहे ही. त्यामुळे शिंगं नाहीत. भुंडी आहे पण पायाच्या टापा धारदार असणार, त्यानं ही जोरदार लढणार."

विचार करून तरसाने ठरवले आधी मादी मारली तर कोवळं पाडस आपलं झालंच. सहज धरायला येईल त्याला. आणि लागलीच आडोशाआडून पुढे येऊन तो मादीवर झेपावला.

मादी धावली. आपल्या पाडसापासून तरसाला दूर न्यायचं म्हणून तुफान वेगाने धावली. ही संधी घेऊन पाडस दुसऱ्या दिशेनं पळालं.

काही मैल मादीमागं धावल्यावर तरस म्हणालं, "बापरे ही बया आवरणं शक्य नाही आपल्याला. इम्पालाच्या माग कोण धावणार आणि शर्यत जिंकणार?"

शहाणपणा करून तरसाने पाठलाग सोडून दिला.

पुन्हा त्याच्या मनात आलं, "पाडस आता एकटंच राहिलंय तिकडं. निघाल्या ठिकाणी मी आता जर गेलो तर आपलं रात्रीचं जेवण होणारच."

पहिल्या ठिकाणी तरस गेले. त्याची खात्रीच होती की आपण पाडसाला धरणारच. पण त्या जागी पोहोचताच त्याला कळून आलं, पाडस आसपास नाही. गायब झालं आहे.



ते पाडस आधारासाठी इम्पालाच्या कळपात गेलं होतं. आता त्याचा बलदंड बाप राखणीला होता. छोट्याश्या सहलीवर गेलेली आई परत येण्याची वाट पहात पाडस बापाच्या जवळ थांबलं होतं.

तरसानं पाडसासाठी बरीच शोधाशोध केली. शेवटी त्याला कळून चुकलं की, आपण अशक्य ते शक्य करण्याचा मूर्खपणा केला. पाडस आणि त्याची आई ह्या दोघांना खाण्याचा अधाशीपणा केला नसता तर आज रात्री आपल्याला असं उपाशीपोटी झोपावं लागलं नसतं.

## तरसाविषयी माहिती

**जात :**

**अंगावर ठिपके असणारा तरस *(Crocuta crocuta)***

बारांचा कळप करून राहणारा.

ह्याला 'एकत्र कुटुंब' असेही म्हणतात.



| | नर | मादी |
|---|---|---|
| उंची | 2 फूट 2 इंच | 2 फूट 4 इंच |
| वजन | 60 किलो | 70 किलो |
| जन्मल्यानंतरचे वजन | 1½ किलो | 1½ किलो |
| आईला पिणे | 6 महिने | 6 महिने |
| वयात येणे | 2 वर्षे | 2 वर्षे |
| गाभण काळ | — | 3 महिने |
| पिल्लांची संख्या | — | 2-4 |
| आयुष्य | 20 वर्षे | 20 वर्षे |

**ओळख :** शरीराच्या मानाने मोठे दिसणारे डोके, गोल मोठे कान, उतरती पाठ व आखूड, गोंडेवाली शेपटी ही उभी दिसते. अंगावरची कातडी रंगाने तांबूस किंवा राखाडी. ह्यावर काळे ठिपके असतात.

**जन्मस्थान :** वाळवंटाचा काठ ते हिम पडणाऱ्या प्रदेशापर्यंत सगळीकडे तरसे असतात.

**सवयी :** तरसाच्या वागण्यातला भयाणपणा आणि कोणाचीही घाबरगुंडी उडविण्याची ताकद असणाऱ्या त्यांच्या आरोळ्यांमुळे आफ्रिकेतल्या अनेक आदिवासी टोळ्यांत भोळ्या समजुती आहेत. उत्तम नजर, तीक्ष्ण घ्राणेंद्रीय आणि उत्तम कान असलेले तरस हे विलक्षण हुषार प्राणी आहेत. आकाशात फिरणारी गिधाडे पाहून मारलेल्या शिकारीचा ह्यांना पत्ता काढता येतो. आपण केलेल्या शिकारीसाठी सिंहाची टोळी आली तरी तिलासुद्धा पळवून लावण्याचे शौर्य तरसांच्या एकत्र कुटुंबात असते.

तरस अन्नासाठी एकटे किंवा जोडीने हिंडतात. सर्व कुटुंब शिकारीची आखणी करून काही तरसांच्या टोळ्या बनवते आणि पद्धतशीरपणे विल्डबीस्ट किंवा ग्रेटर कुडू सारख्या मोठ्या जनावरांची शिकार करते.

**अन्न :** तरस हे रानातले मुडदेफरास आहेत. इतर श्वापदांनी मारून खालेल्या प्राण्याचे उरलेसुरले खरकटे हे तरस फस्त करतात. म्हणजे पर्यावरण स्वच्छ ठेवायला कारणीभूत होतात. त्यांचा जबडा फार दणकट असतो आणि दातही बळकट असतात. त्यामुळे त्यांना मोठी हाडे फोडता येतात, जनावरांच्या कवट्या फोडता येतात, कातडे चावून खाता येते. केवळ मुडदेफराशीवर न जगता ते स्वतःही शिकार करतात.

**वेत :** जुगण्याच्या हंगामात तरस नर माद्या चांदण्या रात्री मोठ्या जमावाने एकत्र जमतात आणि भयंकर धुडगूस माजवतात.

आफ्रिकेत आढळणाऱ्या भुईडुकराच्या बिळात किंवा इतर बिळात तरसाची मादी चार पिल्लांना जन्म देते. ही पिल्ले पिशेषतः त्यातील मादी-पिल्ले, आपले कुटुंब सोडून कधी जात नाहीत. दोन वर्षे तरी ती आपल्या आईवर अवलंबून असतात. सहाव्या महिन्यानंतर आईला पिणे बंद होते.



# झाडावर चढणारा कोल्हा

(स्वाझीलॅन्डमधील एक कथा)

कोल्हा इतर जनावरांशी लबाडीने वागतो हे जगजाहीर होते. त्यामुळे त्याच्यावर कोणी विश्वास ठेवत नसे. पण तरीही कोल्हा सतत कुणा ना कुणाला फसवायचा आणि जनावरं फसायची. "हा बढाया मारणारा आहे" म्हणून सगळे त्याला टाळायचे.

एकदा खाणंपिणं शोधण्याच्या मोहिमेवर बाहेर पडलेल्या कोल्ह्याला रानमांजर दिसलं. झाडाच्या फांदीवर ते मोठ्या ऐटीनं हिंडत होतं. कोल्ह्याला एकदम मांजराविषयी असूया वाटली. का तर कोल्ह्याला असं झाडावर हिंडायला येत नव्हतं.

रानमांजराला त्याने विचारले, "का रे बाबा अशी झाडं वेंधतोस?"

रानमांजर म्हणालं, "झाडावरनं मला चोहोबाजूचं छान दिसतं. शत्रू येतोय का मित्र येतोय हे लांबनं कळतं आणि मी दिसलो की कुत्रा पाठलाग करतो. त्यालाही चुकवता येतं झाडावर चढून."

"किती भेदरट आहेस रे तू रानमांजरा. भेदरट खुळचट पक्षी आणि साप एवढेच झाडात लपतात. बाकी कुणी नाही!"

कोल्ह्याच्या ह्या बोलण्यानं रानमांजर दुखावलं. पण त्यानं तसं दाखवलं नाही. आपला आब होता तसाच ठेवला. कोल्हा लबाड आहे, त्याच्यापासून संभाळूनच राहणं बरं.

मग रानमांजर कोल्ह्याला म्हणालं, " तुझ्यासारखे वेगानं धावणं काही मला जमणार नाही आणि कुत्रा हा तर माझा जन्माचा वैरी आहे."

"मी कुणाही जनावरांपेक्षा जास्ती वेगानं पळू शकतो," बढाईखोर कोल्हा म्हणाला, "मानगुटी धरणारे ते जुने जाणते कुत्रे जरी आले तरी मी नाही बधणार. त्याची टांप नाही मला पळताना गाठायची."

रानमांजर म्हणालं, "खरं आहे. पण झाडावर चढायला येणं हे ऐन संकटाच्या वेळी फार फार उपयोगी पडतं. तुला ही कला शिकावीशी वाटते का? मी शिकवीन."



रानमांजरनं उदार अंतःकरणानं देऊ केलेली ही मदत कोल्ह्यानं स्वीकारली.

"हां, कोणतेही ज्ञान अपाय करत नाही, आणि तूर्त मी मोकळा आहे. हातातली कोणतीही गोष्ट मला अर्धवट सोडावी लागणार नाही," तो म्हणाला.

म्हणजे झाडावर चढणं शिकायला हा अगदी उत्सुक होता.

रानमांजर झाडावरून जमिनीवर उतरलं आणि कोल्ह्याला सुरूवातीचा धडा शिकवला गेला. पण कोल्हा हा काही चांगला विद्यार्थी नव्हता. त्याचे पंजे झाडाच्या फांद्या पकडून ठेवायला उपयोगाचे नव्हते. तो वारंवार फांद्यावरून खाली घसरला. वारंवार खालच्या चिखलात पाठीवर पडला.

कोल्हा मात्र रागाने लाल होत गेला. अखेरीला त्याचा राग अनावर झाला. त्यांन संतापानं रानमांजराला थप्पड लगावली. त्याचा पाय ओढून कोल्हा ओरडला, "माझं हसं केल्याबद्दल मी तुझा जीव घेतो."

खरं म्हणजे रानमांजराचं मरणच ओढवलं होतं. पण त्याच्या पूर्वपुण्याईने रानकुत्र्यांची टोळी अचानक भुंकत भुंकत त्या जागी आली.

त्या टोळीकडे कोल्ह्यानं नजर टाकली आणि त्याचा सगळा रूबाब, सगळी बढाई वितळून गेली. त्यानं रानमांजराचा पाय सोडला. रानमांजर लगोलग झाडाच्या खोडावरनं सरसर वर चढून धोका नाही अशा जागी जाऊन बसलं.

दोन्ही पायात शेपूट घालून कोल्हा धूम पळाला. रानकुत्र्याच्या तावडीतून सुटका करून घेण्यासाठी तो खवल्या मांजराच्या बिळात शिरला. कुत्री मागोमाग होतीच, पण त्यांना बीळ उकरता आलं नाही.

कुत्र्यांनी खटपट करून पाहिली. पण काही इलाज चालेना. तेव्हा कोल्ह्याचा पिच्छा सोडून ती आपल्या वाटेनं गेली.

जरा वेळानं कोल्हा हळूच बिळाबाहेर डोकावला तर झाडावर बसलेलं रानमांजर दात काढून हसताना त्याला ऐकू आलं.

आपला आब राखण्यासाठी तोंड फिरवून कोल्हा दूर पळाला तेव्हा तर ते रानमांजर खो खो हसलेलं त्याला ऐकू आलं.

आता कधीही रानमांजरानं कोल्हा बघितला की ते झाडावर चढून बसतं. कारण आपली फजिती रानमांजरानं बघितली आहे ह्याचा विसर कोल्ह्याला पडलेला नाही आणि कोल्ह्याचा सूड ही फार भीती वाटण्याजोगी गोष्ट आहे हे रानमांजराला माहीत आहे.

# कोल्हा जळक्या आणि राखाडी रंगाचा का झाला

(हॉटेन्टॉट जमातीमधील कथा)

हॉटेन्टॉट लोक सांगतात की प्रत्यक्ष सृष्टीनिर्मातासुद्धा कोल्ह्याच्या लबाड स्वभावामुळे संतापून जाई. इतर जनावरांना कोल्हा असल्या युक्त्याप्रयुक्त्यांनी कसा गांजतो याचा त्याला राग येई.

एकवार निर्मात्यानं त्याची खोड मोडायची ठरवले. लहान पोराच्या रूपानं निर्माता कोल्ह्यासमोर उभा राहिला आणि म्हणाला. "मी वाट चुकलो आहे. चालून चालून फार दमलो आहे. तू मला पाठीवर घेऊन माझ्या खेड्याकडं घेऊन चल. मला नेमकं माझ्या खेड्यात नेऊन सोडलंस तर मी तुला एक कोवळं बकरं बक्षिस देईन."

कोल्ह्यानं पोराला पाठीवर बसू दिलं आणि निघाला. ह्याला फसवून आता एका कोवळ्या कोकराऐवजी त्याचं सगळं शेळ्या मेंढ्यांच खांडच कसं घेता येईल ह्याची योजना तो मनात करू लागला.

एकाएकी पाठीवरच्या पोरानं आपल्याला पायांच्या पकडीत आवळलं आहे याची जाणीव कोल्ह्याला झाली. कोल्ह्याला असा पायाच्या पकडीत गच्च पकडून पोरगा ओरडला, "अरे मी सृष्टीनिर्माता आहे." मग त्यानं जळती मशाल निर्माण केली, हातात धरली. "तुझ्या दुष्टपणाबद्दल भोग ही शिक्षा!" असं म्हणून निर्मात्यानं कोल्ह्याच्या केसाळ फऱ्याला ती पेटती मशाल लावली.

"माझ्यावर दया करा. मला माफ करा," असं कोल्हा ओरडला. पण निर्माता गुप्त झाला होता. पेटती मशाल मात्र त्यानं जाता जाता कोल्ह्याच्या अंगाला लावली होती.

कोल्ह्याला आता काय करावं ते कळेना. तो गडबडा भुईवर लोळला. त्याच्या अंगाला लागलेली आग विझली. हादरून गेलेला, हीन दीन झालेला कोल्हा आपल्या वाटेनं गेला.

म्हणून आजही कोल्ह्याचं अंग जळकं, काळं दिसतं, राखाडी दिसतं. का? तर दुष्टपणानं वागणाऱ्या कोल्ह्याला निर्मात्यानं शिक्षा केली आहे, हे इतर प्राण्यांना कळावं म्हणून.

# कोल्ह्याने सिंहाला कसे बनविले

(झुलू लोकांमधील कथा)

*धूर्त कोल्ह्याचा बिलंदरपणा कसा असतो याचा एक मासलेवाईक नमुना सांगणारी झुलू लोकांमधील ही एक लोककथा.*

कोणे एके काळी चिंचोळ्या खडकातून वाटेत तुरतुरत चाललेल्या कोल्ह्याला अचानक सिंह समोर दिसला. कोल्हा इकडून जात होता आणि सिंह समोरून येत होता. सिंहाला बघून कोल्हा फार घाबरला. आजवर त्याने सिंहाला कैकदा बनविलं होतं. त्याचा आता त्यानं सूड उगवला तर? असं कोल्ह्याला वाटलं.

तात्काळ त्याला युक्ती सुचली. डोंगरकड्याखालून जाणाऱ्या पायवाटेवर तो भिऊन बसल्यासारखा बसला आणि वर बघून ओरडला, "धावा धावा, सोडवा,"

सिंह जागच्या जागी थांबला. कोल्हा समोर दिसताच त्याच्यावर झेप टाकून तो त्याला बुकलणारच होता.

"धावा!" कोल्हा पुन्हा ओरडला, "ही दरड कोसळणार आपणावर. आपण दोघंही मरणार खाली सापडून. सिंह महाराज, आपण महाबळी आहात. काही तरी करा."

सिंहान घाबरून वर पाहिलं. पण त्याला काही विचार करू देण्याआधीच कोल्हा त्याला बळाचा वापर करा म्हणून विनवत होता. डोक्यावरची पुढे आलेली दरड, वरचे मोठेमोठे पाषाण, हे सारे आता कोसळणार असं तो सांगत होता.

"थांबा" कोल्हा पुन्हा ओरडला, "त्या तिकडं दिसतोय तो लाकडाचा ओंडका आणून मी या पाषाणशिळेखाली सारतो. म्हणजे आपण दोघं जगू.

मग सिंहानं आपले बळकट खांदे पाषाणशिळेच्या खाली दिले आणि तो घट्ट उभा राहिला. कोल्हा पळाला.

पाषाणशिळेखाली खांदा देऊन उभा राहिलेला सिंह एकटा राहिला.

किती वेळ तो तिथं राहिला, आणि हाही कोल्ह्याचा एक लबाडपणाच आहे हे केव्हा त्याच्या ध्यानात आलं, हे आपल्याला माहीत नाही. पण एवढे नक्की की त्या दिवसापासून कोल्हा दुप्पट सावधान राहिला असणार.

**कोल्ह्याविषयी माहिती**

**जात :**

**काळ्या पाठीचा कोल्हा *(Canis mesomelas)***

एकटा किंवा जोडीने रहातो. बहुधा जोडीने.



| | **नर** | **मादी** |
|---|---|---|
| उंची | 1 फूट 4 इंच | 1 फूट 3 इंच |
| वजन | 10 किलो | 8 किलो |
| जन्मल्यानंतरचे वजन | 200 ग्रॅम | 200 ग्रॅम |
| आईला पिणे | 2 महिने | 2 महिने |
| वयात येणे | 1 वर्ष | 8 महिने |
| गाभण काळ | — | 2 महिने |
| पिल्लांची संख्या | — | 2-6 |
| आयुष्य | 10 वर्षे | 10 वर्षे |

**ओळख :** युरोपीय कोल्ह्यापेक्षा मोठा आणि उंच असलेल्या ह्या कोल्ह्याच्या पाठीवरील काळ्या पांढऱ्या ठिगळांमुळे हा इतर कोल्ह्यापेक्षा वेगळा दिसतो. ह्याच्या फऱ्यावरच्या आणि पायाच्या पिवळसर रंगावर ही पाठ उठून दिसते. ह्याला मोठे, उभे आणि टोकदार कान असतात. शेपटीच्या सोग्याला शेवटी काळे केस असतात.

**जन्मस्थान :** गवताळ कुरण आणि कमी झाडाझुडपांचे रान.

**सवयी :** आफ्रिकेत कोल्हे सर्वत्र आढळतात. त्यांचा वावर रात्री असतो. संध्याकाळ झाल्यानंतर त्यांचे विशिष्ट ओरडणे (ज्याला 'कोल्हेकुई' असा शब्द मराठीत आहे.) ऐकू येते. कोल्हा फार कावेबाज प्राणी आहे. ते हलक्या अंगाचे असतात आणि बघता बघता दिसेनासे होतात.

जोडीदारणीबरोबर किंवा एकटे रहातात. पाण्याजवळच्या आडोश्याला लपून शिकार शोधतात.

कोल्हे हे 'खरे' कुत्रे आहेत. त्यांच्या पुढच्या पायाला पाच बोटे आणि मागच्या पायाला चार बोटे असतात. पाळीव अशा कित्येक कुत्र्याची वंशकुळी कोल्ह्याची आहे, असे प्राणीशास्त्रज्ञ मानतात.

**अन्न :** कोल्हे मुडदेफराशी करतात आणि शिकारही करतात. लहान उंदीर, जमिनीवर घरटी करणारे पक्षी, त्यांची अंडी पिल्ले, सरपटणारे प्राणी, लठ्ठ कीटक आणि फळे हे कोल्ह्याचे अन्न आहे. रानात व्यालेल्या हरिणीचे पाडस आणि पाळलेल्या गुराढोरांची वासरे हेही कोल्हे मारून खातात. म्हणून शेतकरी त्यांना शत्रू समजतो आणि गोळ्या घालतो. कोल्हे उंदरांचा संहार करतात हे माहीत असूनही.

केलेली शिकार खाऊन सिंह केव्हा जातो ह्याची वाट पहात कोल्हे थांबतात आणि सिंह खाऊन गेला की उरले सुरले खातात. काही धाडशी कोल्हे सिंहादेखत त्याच्या शिकारीतले ताकडेतुकडे पळवतात. कोह्याच्या चातुर्यावर रचलेल्या गोष्टी आफ्रिकाभर आढळतात.

**वेत :** सहापेक्षा जास्त पिल्लांना कोल्हीण जन्म देत नाही. आईबाप आपल्या बाळांना जमीन उकरून केलेल्या बिळात, किंवा खडक कपारीतल्या खबदाडीत दडवून वाढवतात. आईचे दूध पिणे झाल्यावर दोघे आईवडील बाहेर जाऊन शिकार खातात. अर्धवट पचन झालेले ते अन्न पोटातून बाहेर काढून पिल्लांना भरवतात.



# हत्ती शिष्टाचार शिकतो

(शोना जमातीमधील कथा)

एके दिवशी नदीकडे जाणाऱ्या वाटेवर हत्तीला खार आडवी आली. सम्राटासारख्या तोऱ्यात चालणाऱ्या मातब्बर हत्तीनं तिला सोंडेनं वाटेतून बाजूला सारून म्हटलं, "बाजूला हो ग भिक्कार, चिमुरडे."

खारीला हा मोठा अपमान वाटला. तीही कोणी होतीच की. ह्या हत्तीला नीट वागायचं शिकवायला पाहिजे असं तिला वाटलं.

"ए" खार ओरडली, "असशील तू ढीग मोठा, मातब्बर उंचाडा समजत स्वतःला. पण मी सांगते, चुकीचं आहे हे तुझं वागणं!" हत्तीनं वळून तिच्याकडं आश्चर्यानं पाहिलं व म्हटलं, "अंहं, चूकबीक काही नाही. मी मोठा आहे हे नकट्या पोरालासुद्धा माहीत आहे."

टिर्र, टिर्र आवाज काढत आणि वरचेवर शेपूट उडवत खार रागानं म्हणाली, "मी असेन चिमुरडी. पण तुझ्यापेक्षा दसपट जास्ती खाऊन दाखवते तुला. पैज तुझी माझी. होऊन जाऊ दे शर्यत आपली. कोण जास्ती ताडगोळे खातंय ह्याची. मीच जास्ती खाईन आणि जास्त वेळसुद्धा खाईन. कळलं का हो थोर हत्ती महाराज?"

हत्ती मोठ्यांदा हसला. त्याला फार गंमत वाटली. आणि गंमत म्हणूनच त्यानं त्या चिमुरड्या खारीनं दिलेलं आव्हान स्वीकारलं. शिवाय त्याला ताडगोळे फार आवडायचे.

मग ह्या दोघांनीही ताडगोळ्याचे मोठे ढीग जमवले आणि दुसऱ्या दिवशी सकाळी शर्यतीला लागायचं असं ठरवलं. हत्तीनं अगदी मनावर घेतले होते. त्याला दम निघत नव्हता. संध्याकाळचं बाभळीच्या शेंगाचं चवदार जेवणसुद्धा त्यांन टाकलं. म्हणाला, उद्या शर्यतीच्या वेळेला सटकून भूक लागायला पाहिजे. खारीला एकदा तिची जागा दाखवूनच दिली पाहिजे.

दुसरा दिवस उजाडला. स्वच्छ आकाश, सुरेख कोवळं उन्ह, छान दिवस होता. दोघांनी ताडगोळे खाणं सुरु केलं.

भुकेल्या पोटी हत्ती चवीनं सावकाश खाऊ लागला. खारीनं भराभर कुरतडायला सुरूवात केली आणि लवकरच तिच पोट टम्म झालं. तशी ती गुपचूप निघून गेली. जवळच दडून वाट बघत बसलेल्या चुलत भावंडाला तिनं खायला पाठवून दिलं.

हत्ती खाण्याच्या कामात इतका दंग होता की खार गेली आणि तिचे चुलत भावंड तिच्या जागी आले, ह्याचा कशाचा पत्ता त्याला लागला नाही.

मग खारीचे भाऊ, बहिणी, चुलतभावंड, काका, आत्या अशी भुकेली मंडळी एकापाठोपाठ एक येऊन ताडगोळ्यांचा ढीग कमी कमी करत गेली. दुपारच्या वेळी हत्तीनं खाण्यातनं डोकं वर करून पाहिलं तर प्रतिपक्षी खाण्यात दंग आहे. खार नुसती खाण्यात दंग नव्हती तर तिच्या पुढ्यातला ताडगोळ्याचा ढीग हत्तीच्या ढिगासारखाच झपाट्यानं कमी झालेला होता.

मग हत्तीने विचारलं, "काय खारूताई भरलं का पोट?"

भरल्या तोंडानं खार म्हणाली, "नाही अजून. तुमचं हो गजराज?"

"छे. आमचं कधीच भरणार नाही," असं उत्तर देऊन हत्ती भराभर खाऊ लागला.

संध्याकाळी सूर्य मावळायच्या सुमारास हत्तीचं पोट एवढं भरलं की त्याला धड उभं रहाता येईना. त्यानं समोर बघितलं तर खारूताई (शेजारच्या झाडावर मोठी झोप काढून परत ताडगोळ्यांवर आली होती) अजूनही ताडगोळे खातच होती.

हत्ती आवाज करून कण्हला, "खारूताई, धन्य आहे तुझी. आता मी हरलो. ह्यापुढं खाणं नाही होणार. तू जिंकली आहेस देवी!" आणि सलाम करायला हत्तीनं सोंड वर केली.

खारीनं आनंदानं उड्या घेऊन हत्तीचे आभार मानले. ती म्हणाली, "इथून पुढं दंभाचार करणं सोडून दे."

त्या दिवसापासून आजतागायत हत्तीनं खारीविषयी सतत आदरच दाखवला आहे.

# हत्ती आणि पाऊस

(बुशमन लोकांमधील एक पुरातन कथा)

एके काळी निसर्गात दोन बलवंत शक्ती होत्या. हत्ती आणि पावसाचा देव.

अभिमानी आणि बढाईखोर हत्ती पावसाशी नेहमी वाद घालायचा. 'दोघात हत्ती मोठा आहे' असं पावसानं मान्य करावं हा हत्तीचा हेतू असायचा.

एकदा अशाच वादात पावसानं आपल्या ओल्या आणि खळखळाट करणाऱ्या आवाजात हत्तीला विचारलं "अहो गजराज, जिथं मी तुम्हाला चारा देतो तिथं माझ्यापेक्षा तुम्ही कसे मोठे असाल?"

अभिमानी हत्ती हे कसे मान्य करणार? काहीही विचार न करता तो म्हणाला, "तू नाहीस मला चारा देत. माझा मी शोधतो आणि खातो. स्वतःच्या हिंमतीवर मी जगतो."

आता वाद घालायचा नाही. आपलं सामर्थ्य दाखवायचं असं पावसानं ठरवलं. त्यानं आभाळ काळभोर केलं, गडगडाट केला आणि तो बोलला, "समजा मी नाहीसाच झालो, तर तू जगशील?" आणि पाऊस नाहीसा झाला.

पाऊस दिसेनासा झाल्यावर हत्ती आपल्याशीच मोठ्यांदा हसला, "आता सगळं राज्य माझंच! पाऊस पळून गेला म्हणजे 'आपण हार खाल्ली' हेच त्यानं जाहीर केलं."

मग जंगलावर आणि रानावर सहाएक महिने हत्तीचंच राज्य होतं. सगळं सुरळीत चालू राहिलं. पावसाची आणि हत्तीची सततची खडाजंगी वादावादी नसल्यामुळं सगळीकडं शांतता राहिली.

मग पाऊसकाळ आला. आता पुष्कळशा प्राण्यांच्या पोटात गर्भ होते. हिरव्या लुसलुशीत गवतानं आणि स्वच्छ पाण्यानं पाठच फिरवली होती. निळं आभाळ उष्ण राहिलं. कुठे कोपऱ्यातसुद्धा काळा ढग उमटला नाही.

पोटातली बाळं भुकेलीच राहिल्यामुळे सगळे प्राणी काळजीत पडले.

जेरीला येऊन सगळे हत्तीला शोधत गेले. तोच त्यांचा रक्षण करणारा होता. हत्ती थोडा अस्वस्थ झाला पण प्रजेच्या मागणीची कदर करून म्हणाला, "गिधाड हे पाऊस आणण्यात वस्ताद आहे. मी त्याला बोलावणं करतो."

हत्तीनं गिधाडाला निरोप पाठवून बोलावलं. पण गिधाड हे पावसाचं नोकर होतं. हे दोघं आपसात मोठे भांडलेत हे त्याला माहीत होतं.

निरोप आणणाऱ्याला ते म्हणालं, "मला जमणार नाही. माफ करा. पाऊस आणणं झालं नाही माझ्याकडून, तर गजराज काय करतील ह्याची मला भयंकर भीती आहे."

मग हत्तीनं सगळ्या पक्षात शहाणा म्हणून घेणाऱ्या कावळ्याला बोलावलं. "पाऊस आणण्यासाठी तू सोडत चिठ्ठी उचल," असं त्याला फर्मावलं. कावळ्यानं थोडा पाऊस आणला. काही भागातले झरे पाण्यानं वाहू लागले. पण काही काळानं तेही कोरडे पडले. बराच खोल असा एक झरा होता तो आटला नाही. हत्तीनं हा शेवटचा झरा आपल्या स्वत:साठी राखून ठेवला. कासवाला सांगितलं, "मी चरायला दूर गेल्यावर तू हे पाणी राखायचं." (चरण्यासाठी गवत मिळणं फार कठीण झालं होतं.)

"जशी आपली आज्ञा महाराज," असं म्हणून कासव राखणीवर रूजू झालं.

एका जिराफाच्या कळपाला पुष्कळ तपास करूनही कुठं पाणी प्यायला मिळाले नाही तेव्हा तो कळप ह्या झऱ्यावर पाणी प्यायला आला. कासवानं त्याला अडवलं. पाणी प्यायला मना केली. "हे तळं गजराजांनी स्वत:साठी राखून ठेवलं आहे," असं सांगितलं.

झेब्रे, सरळ शिंगे, फऱ्यावर व तोंडावर काळे पट्टे असणारी काळविटे, केसाळ लांबडं तोंड, वाकडी शिंगे आणि लांब शेपटेवाली काळविटे, त्सेसिबी काळविटे, स्प्रिंगबॉक जातीची लहान काळविटे, खेरीज आणखी इतर प्राणी ह्या सगळ्यांना कासवानं पाणी पिऊ दिलं नाही. हे सगळे प्राण्यांचे कळप आपसात कुजबुजत माघारी परतले. पाणी नाही तर आपण जगणार कसे ह्या काळजीनं सगळ्यांना घेरलं.



संध्याकाळी झऱ्यावर पाणी प्यायला सिंह आला. कासवानं सांगितलं, "इथं इतरांनी पाणी प्यायचं नाही. हा झरा गजराजांचा आहे." सिंहानं न ऐकल्यासारखं केलं. कासवाला बाजूला ढकलून तो शांतपणे भरपूर पाणी प्याला. बापडं कासव काय करणार?

सिंहाचं बघून इतर तहानलेल्या प्राण्यांनीही झऱ्याभोवती गर्दी केली आणि पोटभर पाणी पिऊन घेतले. हत्ती चरून परत आला. बघतोय तर झऱ्याचं सगळं पाणी संपून फक्त राड राहिलेली. रागारागानं हत्तीनं सोंडेची तुतारी वाजवली आणि तो बिचाऱ्या कासवावर धावून गेला. त्यानं कासवाला जाब विचारला.

"मी दीन दुर्बल माझं कोण ऐकणार? तहानेनं कासावीस झालेल्या प्राण्यांना मी कसा थांबवणार?" अस समजावून सांगण्याचा प्रयत्न कासवाने केला. पण हत्ती इतका संतापलेला होता की त्यानं कासवाला सोंडेनं उचलून ते अख्खं गिळून टाकलं.

कासवाला मरायचं नव्हतंच. का म्हणून त्यानं उगाच आपली शिक्षा सोसायची?

हत्तीच्या पोटात गेल्या गेल्या त्यानं बाहेर पडण्यासाठी पोटाचा मऊ भाग फाडायला सुरूवात केली.

हत्ती वेदनेनं किंचाळायला लागला. आपला अभिमान, आपला उद्धटपणा ह्याची ही फळं आहेत. त्यामुळे वैऱ्याला येऊ नये असलं यातनामय मरण आपल्या वाट्याला आलं हे त्याला कळून चुकलं.

कासव वाट काढून बाहेर आलं आणि इकडं हत्ती मरून पडला.

लगोलग कासव तिथनं सटकलं. तेव्हापासून त्याला कुणी प्रश्न विचारला तरी ते कधी तोंड उघडत नाही. कोणाला ते धनी मानत नाही. मनाला येईल तसं वागतं.

सगळ्या प्राण्यांना जन्माचा धडा मिळालेला बघून पावसाच्या देवाला तहानेल्या धरतीची करूणा आली. पाऊस धुवांधार कोसळला. सगळ्या नद्या, सगळे ओढे पुन्हा धोधार वाहू लागले.

**हत्तीविषयी माहिती**

**जात :**

**आफ्रिकेतील हत्ती *(Loxodonta africana)***

नर एकटे रहातात. माद्या कुटुंबात आणि तात्पुरत्या एकत्र आलेल्या दोनशे हत्तींच्या कळपात रहातात.




| | **नर** | **मादी** |
|---|---|---|
| उंची | 10 फूट | 9 फूट |
| वजन | 5,000 किलो | 3,500 किलो |
| जन्मल्यानंतरचे वजन | 120 किलो | 120 किलो |
| आईला पिणे | 2 वर्षे | 2 वर्षे |
| वयात येणे | 16वर्षे | 14 वर्षे |
| गाभण काळ | — | 1 वर्षे 10 महिने |
| पिल्लांची संख्या | — | 1 |
| आयुष्य | 55 वर्षे | 70 वर्षे |

**ओळख :** जमिनीवर रहाणाऱ्या प्राण्यातले जगातील सर्वांत मोठे प्राणी. आफ्रिकेतील हत्ती आणि आशियातील

हत्ती ह्या दोन्हींतील फरक जाणून घ्यावा असा आहे. 'आशियन हत्ती' हा आफ्रिकेतील हत्तीच्या तुलनेने पुष्कळच लहानखुरा आहे. त्याचे कानही लहान आहेत आणि फक्त नरांनाच सुळे असतात. शिवाय ह्या हत्तीला माणसाळवून कामाला लावता येते. सर्कशीत माणसाच्या मनोरंजनासाठीही त्याचा उपयोग करून घेता येतो. आफ्रिकेतला हत्ती फारच क्वचित अशा कामासाठी उपयोगात आणला गेला आहे. अशा प्रयत्नांना फार क्वचित यश मिळालेले आहे.

**जन्मस्थान :** गवताळ प्रदेश आणि लहान झाडाझुडपांचे कुरण, दाट जंगल, फार चढण, आणि खड्डे खळगे नसलेले डोंगराचे उतार.

**सवयी :** हत्ती कुटुंबे करून रहातात. दहापासून वीसपर्यंत एक कुटुंब असते. ह्याची प्रमुख ही एक अनुभवी हत्तीण असते.

हत्तींची नर-पिल्ले वयात आल्यावर. वेगळे निघून तात्पुरता 'कारा' कळप स्थापन करतात. आणि सगळ्यात बलवंत कोण हे ठरविण्यासाठी आपसात मारामारी, लट्ठालट्ठी करतात. जो बलवंत ठरतो तो आपल्या कुटुंबाकडे परततो. कारण त्याला जोडीदारीण शोधायची असते. ह्याचा अर्थ जे बलवंत असतात तेच बाप होतात. जुने नर एकएकटे किंवा जोडीने राहतात. पहिल्या कुटुंबात ते कधी सामील होत नाहीत.

दुष्काळात अनेक कुटुंबे एकत्र येतात आणि अन्न शोधत भटकतात. असा एकत्र आलेला कळप रात्री मोठी मजल मारून दूरवर जातो आणि चरण्यात मोठा वेळ घालवतो. हत्तींना पाणी हवे हवेसे वाटते. ते चांगल्या तऱ्हेने पोहू शकतात. प्रौढ हत्ती एक तहानेत शंभर लिटर (बावीस गॅलन) पाणी पितो. पाणी पिऊन झाल्यावर, सोंडेने पाण्याच्या पिचकाऱ्या सोडण्यात, चिखलात लोळण्यात, आपण पावडर चोपडतो तशी वाळू अंगावर टाकून घेण्यात तास दोन तास घालवतात.

कोरड्या वाळूत खोल खड्डे उकरून त्यात सोंडभर पिण्याचे पाणी येण्याची वाट बघत हत्ती थांबून रहातात. हत्ती पाणी पिऊन गेल्यावर इतर जनावरांना हे पाणी उपयोगी पडते. अन्न तोंडात घालण्यासाठी, पाणी पिण्यासाठी, उभ्या झाडाची साल काढण्यासाठी, वास हुंगण्यासाठी, झाडावरची फळे काढण्यासाठी सोंड हे एक बहुगुणी साधन हत्तीपाशी आहे. प्रौढ हत्तीला नैसर्गिक शत्रू नसतोच. पण सोंड हे हत्यार म्हणून उपयोगात आणता येते. धावून अंगावर येणारा हत्ती ताशी चाळीस किलोमीटर (ताशी पंचवीस मैल) वेगात असतो. अर्थात कमी अंतरापुरताच.

**अन्न :** हत्ती झाडपाला आणि गवत खातो. दिवसाला तीनशे किलो (सहाशे साठ पौंड) गवत त्याला लागते. हत्ती गवताशिवाय अनेक प्रकारची पाने, फळे, मुळे आणि झाडाच्या साली खातो. एका आयुष्याच्या काळात हत्तीला सहा वेळा दात येतात. झाडाच्या शेंड्यावर असलेली मूठभर कोवळी पाने सोंडेत घेण्यासाठी किंवा मुळे खाण्यासाठी हत्ती जी नासधूस करतो. त्यामुळे तो 'खाणे' वाया घालवणारा भक्षक होतो.

**वेत :** विण्याच्या वेळी दोन किंवा तीन हत्तिणी मदतीसाठी बरोबर घेऊन हत्तीण कळप सोडून जाते. बरोबर आणलेल्या दोघी तिघी लहान पिल्लाची काळजी घेण्यात मदत करतात. काही दिवसांनी कळपापर्यंत जाण्याएवढी शक्ती पिल्लात आल्यावर सगळ्याजणी कळपात परततात.



# गेंडा आपले शेण का विस्कटतो

(बाटोन्का लोकांमधील कथा)

कोणे एके काळी जंगलातील प्राण्यांना बोलायला येत होतं. तेव्हा हत्ती गेंड्याला चिडवायचा, "बेट्या तू मार्थेफिरू तर आहेच पण तुला जवळचं दिसतही नाही." (हे हत्तीचं बोलणं काही बरोबर नव्हतं. कारण स्वतः हत्ती हा काही तीक्ष्ण दृष्टीचा आणि सुस्वभावी मानला जात नाही.) असं चिडवणं गेंडा किती काळ सहन करेल. तो चिडला. त्यानं पैज लावली. (कारण, आपण नक्की जिंकू अशी गेंड्याला खात्री होती. एका बाबतीत तरी आपण हत्तीला उजवं आहोत हे दाखवू.)

मोठ्यात मोठा शेणाचा ढीग कोण टाकतो, याची ती पैज होती.

ही दोन्हीही जनावरं अंगापिंडानं भलीमोठी आहेत. दोघांनाही रोज ढीगभर गवतपाला खायला लागतो. दोघंही रोज शेण टाकतात.

पण हत्तीनं नीट तपास केला तेव्हा गेंड्याचा ढीग हत्तीच्या ढीगापेक्षा जास्त मोठा आहे असं त्याला आढळून आलं.

आपण पैजेत हत्तीला हार खायला भाग पाडलं, ही गेंड्याची फुशारकी फार काळ टिकली नाही. पराभव झालेला हत्ती मत्सराने पेटला. त्यानं गेंड्याला सोंडेनं ठोकून काढलं, सुळ्यांनी जागोजागी भोसकून हैराण केलं.

बेजार झालेला गेंडा दीनपणे त्याला विनवू लागला, "महाराज, बास करा. माझी चुकी झाली. तुम्ही थोर, सगळ्यात तुम्ही मोठ्ठे. तुम्ही जिंकलात, मी हरलो. आता बास करा."

बापडा गेंडा पोट वर करून पाठीवर पडला आणि भीतीनं ओरडत राहिला.

हळूहळू हत्तीचा राग शांत झाला. त्यानं गेंड्याला माफी मागायला भाग पाडलं, कबूल करायला लावलं. "माझ्यासारख्या थोरामोठ्याशी पैज मारण्याचा उद्धटपणा पुन्हा जन्मात करू नकोस," असा दम भरला. मग हत्तीचं समाधान झालं. गेंड्याची त्याच्या तावडीतून सुटका झाली.



तो हग्या मार गेंडा कधी विसरला नाही. हत्ती पुन्हा केव्हाही आपल्याला गाठून बडवील ह्या धास्तीने आजही तो आपल्या शेणाचा ढीग लाथेने पसरवून उडवून अगदी सपाट करतो.

# हरवलेला काटा

(न्डबीलि जमातीमधील कथा)

जुन्या काळी एकवार हत्ती आणि गेंडा ह्यांच्यात वादावादी होऊन अखेर हाणामारी झाली. (तुम्हाला माहितच आहे हे दोघेही शीघ्रकोपी आहेत.) गेंडा निधड्या छातीनं हत्तीवर तुटून पडला. आपल्या अणकुचीदार शिंगानं हत्तीला अनेक जखमा केल्या. संतापानं त्याला अगदी आंधळं केलं होतं.

हत्तीने मात्र आपला तोल जाऊ दिला नाही. तो गेंड्यापेक्षा अंगानं धिप्पाड होता, जास्ती बलवान होता. आपले लांब सुळे त्याला वापरता आले. हळूहळू तो गेंड्याला भारी ठरला. शेवटी गेंड्याला हार खावी लागली. हत्तीच्या हल्ल्यानं गेंड्याच्या अंगावरचं जाड कातड काही जागी ठेचलं, फाटलं. लंगडत लंगडत तो पाठ फिरवून गेला.

गेंड्याला वेदना सोसवत नव्हत्या. त्याच्या जखमातून बाहेर पडणारे रक्त थांबत नव्हते. गेंडा साळिंदराकडे गेला. ती आपल्याला मदत करील याचा त्याला भरवसा होता.

तो म्हणाला, "साळूबाई, तुमच्या अंगावरचा सर्वात कठीण आणि सर्वात लांबडा असा एक काटा मला द्या. म्हणजे माझं कातड जिथं जिथं जास्ती फाटलंय तिथं मी टाके घालीन. काट्याचा मला सुईसारखा उपयोग होइल."

साळिंदराला रात्री खाणं शोधत हिंडावं लागे. ते दिवसा झोप काढी. झोपमोड झाल्यामुळं साळींदर वैतागलं होतं. केव्हा एकदा गेंडा जातो आणि आपण पुन्हा झोपतो असं त्याला झालं होतं. फार खळखळ न करता त्यानं आपला काटा उसना देण्याचं मानलं. गेंड्यावर आलेल्या प्रसंगाचंही त्याला वाईट वाटत होतं.

साळींदर म्हणालं, "बाबा रे, मी माझा सर्वात चांगला काटा तुला देतो, पण तुझं काम झालं की तो माझा मला परत आणून दे. सिंहासारख्या शत्रूकडून माझा बचाव ह्या काट्यामुळेच होतो. तू हा काटा आठवणीनं परत आण."

गेंड्याने ही अट मान्य केली. तो म्हणाला, "उद्याच मी तुझा काटा आणून देतो."

गोरख चिंचेच्या सालीचा धागा वापरून गेंड्यानं फाटलेले अंग शिवून टाकलं. (ह्या शिवणीच्या खुणा आजही गेंड्याच्या अंगावर दिसतात.)

आपल्या हस्तकलेवर खूष झालेल्या गेंड्यानं विश्रांतीसाठी मऊ गवतावर अंग पसरलं. जखमा भरून येण्यासाठी त्याला गाढ झोप पाहिजेच होती. झोपेआधी साळींदराचा काटा त्याने उशाशी नीट ठेवून दिला.

काही दिवस गेले. एका संध्याकाळी गेंड्याची आणि साळिंदराची गाठभेट झाली. साळिंदराला बघताच गेंड्याला त्या काट्याची आठवण झाली. पण शिवून झाल्यावर काटा कुठं ठेवला ते काही केल्या त्याला आठवेना.

शिवणकामाच्या वेळी सुई तोंडात धरली होती हे आठवत होतं. बाप रे! म्हणजे काटा आपण गिळला की काय चुकून?

बराच काळ खोल विचारात गढल्यावर गेंड्यानं निष्कर्ष काढला. काटा जर पोटात गेला आहे तर केव्हा ना केव्हा तो शेणात दिसेलच. दिवसभराच्या खाण्यातून जे जे पोटात जाते ते दुसऱ्या दिवशी सकाळी बाहेर पडलेलं नाही का दिसत, तसाच काटाही दिसेल.

त्याने हे सगळं साळिंदराला सांगितलं. तुझा घेतलेला काटा मी परत करीनच करीन असं आश्वासन त्याला दिलं.

त्या दिवसापासून गेंडा आपलं शेण पायानं विस्कटतोय ते आजपर्यंत. त्याला आशा आहे की केव्हा ना केव्हा तरी साळिंदराचा गमावलेला काटा आपल्या शेणात सापडेल.

**गेंड्याविषयी माहिती**

**जात :**

**पांढरा गेंडा** ***(Ceratothrtium simum, Syn. Diceros simus)***

नर बहुधा एकटे रहातात. बऱ्याच माद्या मिळून दहा जणांचा एक कळप तयार करतात. त्याला 'लागर' (laager) असे नाव आहे.




| | नर | मादी |
|---|---|---|
| उंची | 6 फूट | 5 फूट 4 इंच |
| वजन | 3,000 किलो | 2,000 किलो |
| जन्मल्यानंतरचे वजन | 40 किलो | 40 किलो |
| आईला पिणे | 2 वर्षे | 2 वर्षे |
| वयात येणे | 7 वर्षे | 5 वर्षे |
| गाभण काळ | — | 1½ वर्ष |
| पिल्लांची संख्या | — | 1 |
| आयुष्य | 45 वर्षे | 45 वर्षे |

**काळा गेंडा** ***(Diceros bicornis)*** एकटा रहातो.

***नाहीसा होण्याच्या मार्गावरील प्राणी.***

| | नर | मादी |
|---|---|---|
| उंची | 4 फूट 8 इंच | 4 फूट |
| वजन | 1,500 किलो | 1,000 किलो |
| जन्मल्यानंतरचे वजन | 40 किलो | 35 किलो |
| आईला पिणे | 2 वर्षे | 2 वर्षे |
| वयात येणे | 7 वर्षे | 5 वर्षे |
| गाभण काळ | — | 1 वर्ष 5 महिने |
| पिल्लांची संख्या | — | 1 |
| आयुष्य | 40 वर्षे | 40 वर्षे |

**ओळख :** पांढरा आणि काळा अशी नावे असली तरी हे दोन्हीही गेंडे करड्या रंगाचे असतात. अंगावरची कातडी जाड असते. गळ्याभोवती तर ह्या जाड कातडीची वळीच असते. कानांची आणि शेपटीचे टोके वगळता ह्यांच्या अंगावर कुठेही केस नसतात. हे जेव्हा धुळीने माखले जातात किंवा राडीत लोळून वाळतात तेव्हा ह्यांचा रंग काहीसा वेगळा दिसतो. पांढरा गेंडा आणि काळा गेंडा ह्यांच्यात मोठा फरक असतो तो ओठात. काळ्या गेंड्याचा वरचा ओठ टोकदार व लवलवता असतो. त्याला झाडपाने, वेली ओरबाडून खाता येतात. पांढऱ्या गेंड्याचा वरचा ओठ चौकोनी आकाराचा असतो. तो गवतावर चरतो. चरण्याच्या ह्या फरकामुळे, काळा गेंडा मान वर करून चालतो आणि पांढरा गेंडा मान खाली घालून चालतो. पांढऱ्या गेंड्याच्या मानेवर वशिंड असते आणि काळ्यापेक्षा हा मोठा असतो. हत्तीच्या खालोखाल गेंडा हे जमिनीवरचे मोठे जनावर आहे.

ह्या दोन्ही गेंड्यांना शिंगे असतात. नरांना आणि माद्यांनाही शिंगे असतात. गेंड्याचे शिंग हे केसांचे बनलेले पण हाडासारखे कठीण असते. ह्या शिंगापासून संधिवातावर उपयागी असे औषध करतात. आशियातील काही भागातील लोक मैथुनशक्ती वाढविण्यासाठीही शिंगाच्या औषधाचा उपयोग करतात.

अगदी अलीकडील काळापर्यंत गेंड्याच्या शिंगाचा उपयोग येमेनमधील पुरूष हे खंजिराची मूठ करण्याकडे करीत. ह्या उपयोगासाठी गेंडे मारले गेले. आता ही जात नाहीशी होण्याच्या मार्गावर आहे.

**जन्मस्थान :** तुरळक झाडे झुडपे असलेले गवताळ माळरान, काटेवन, डोंगरांचे उतार.

**सवयी :** गेंडा एकटा किंवा लहान कुटुंबात रहातो. रहात्या रानावर मालकी गाजवतो. त्याच्या हद्दीत एखादा तरी पाण्याचा झरा असतो. इथे लोळण्यासाठी त्याला राड हवी असते. रानाच्या बांधावर नर गेंडा शेणाचे ढीग रचतो. ह्या जागी तो वरचेवर जातो, मागच्या पायांनी आणि शिंगाने हा थर विस्कटून त्याचा सपाट थर करतो. हा थर सहा फूटापेक्षा जास्त रूंदीचा असतो. हा थर बघून इतर गेंड्यांना ताकीद घ्यावी आणि हद्दीच्या आत शिरण्याचे धाडस करू नये असा इशारा असतो. शिवाय हा थर मादीला आकर्षित करणारी जाहिरातही असते.

ह्या दोन्ही गेंड्याच्या स्वभावात फरक असतो.

काळा गेंडा चट्कन मारकुटा होतो आणि आपल्या हद्दीत शिरणाऱ्याच्या अंगावर धावून जातो, मग शिरणाराने शिरजोरी केली असो वा नसो. त्या मानाने पांढरा गेंडा मवाळ असतो. पण त्याच्यापासूनही जपून रहाणे बरे. सकाळी आणि तिसऱ्या प्रहरी गेंडे चरायला बाहेर पडतात आणि रात्री पाण्यावर जातात.

**अन्न :** पांढरा गेंडा गवतावर चरतो आणि काळा गेंडा झाडपाने, डहाळ्या खातो.

**वेत :** ठराविक काळ नाही. तीन वर्षांपेक्षा कमी काळानंतर एक पिल्लू जन्माला येते.



# पाणघोड्यांनी मासे खायचे नाहीत

(बुशमन लोकांमधील कथा)

*पाणघोडा आपले शेण का विस्कटून टाकतो या विषयीची ही गोष्ट आहे. बुशमन जमातीतील लोकांनी ही गोष्ट पहिल्याने सांगितली असली तरी आफ्रिकेतील सर्व जमातीत ती ऐकावयास मिळते.*

सृष्टिनिर्माता वेगवेगळ्या प्राण्यांना रहायला जागा वाटून देत होता तेव्हा पाणघोड्याच्या जोडीनं विनवणी केली, "आम्हाला थंडगार पाण्यात रहायला परवानगी असावी." त्यांना पाण्यातच रहाणं पसंत होतं.

सृष्टीनिर्मात्यानं पाणघोड्याकडं पाहिलं आणि त्याच्या मनात शंका आली. पाणघोड्यांची तोंडे भली मोठी होती. दातही मोठे मोठे अणकुचीदार होते. अंगाने ते अवाढव्य होते आणि त्यांची भूकही फार मोठी होती. म्हणजे, हे लेकाचे पाण्यात मासा शिल्लकच नाही ठेवायचे.

निर्मात्यानं आधीच पाण्यात रहाण्याची परवानगी मगरीला दिली होती. अंगापिंडानं मोठे, मोठ्या भुकेचे दोन प्राणी एका जागी कसे ठेवावे? पाणघोड्यांची विनंती मान्य झाली नाही. निर्मात्यानं सांगितले, "तुम्ही लोक जमिनीवरच रहा."

हे ऐकताच दोन्ही पाणघोडे रडा ओरडायला लागले. त्याचा भयाण आवाज होत राहिला. दोघांनी पुन्हा पुन्हा विनंती केली. शेवटी निर्मात्याला त्यांची मागणी मान्य करावी लागली. पण निर्मात्यानं पाणघोड्याकडून एक वचन घेतलं, "पाण्यात रहा, पण माशाला धक्का नाही लावायचा. गवत खाऊन जगायचं."

पाणघोड्यांनी शब्द दिला आणि आनंदानं गोंगाट करत ते पाण्यात शिरले.

त्या दिवसापासून रोज पाणघोडे आपले शेण नदीतीरावर विस्कटतात. निर्मात्यानं त्यात माशांची हाडे दिसतात का ह्याचा खुशाल तपास घ्यावा. तुम्ही कान देऊन ऐकाल तर आपल्याला पाण्यात रहाण्याची परवानगी मिळाली म्हणून पाणघोडे आनंदाने हसल्याचे ऐकू येईल.

# जेव्हा पाणघोडा केसाळ होता

(न्डबीलि जमातीमधील कथा)

*पाणघोडा दिवसा पाण्यातच रहातो आणि रात्री तेवढा चरण्यासाठी पाण्याबाहेर येतो. असे तो का करतो याचा खुलासा करणारी एक गोष्ट आफ्रिकेतील न्डबीलि जमातीत सांगितली जाते. ती अशी आहे :*

फार फार वर्षांपूर्वी पाणघोडे नद्यांतून, तळ्यांतून रहात नव्हते. प्राण्यांचे कळप जसे जंगलात रहातात तसेच रहात होते. तेव्हा पाणघोड्याच्या अंगावर दाट, मऊसूत, किरमिजी रंगाचे केस होते. त्याचे कान सुरेख केसाळ होते आणि शेपटीचा गोंडा झुपकेदार होता. आपल्या झकास शेपटीचा पाणघोड्याला फार अभिमान होता.

रोज दुपारी पाणी पिण्यासाठी झऱ्यावर गेल्यावर पाणघोडा आपल्या पाण्यातल्या प्रतिबिंबाकडे टक लावून पहात राही. असा फिरे, तसा फिरे आणि आपलं रूप चौफेर बघे. इतर प्राण्यांनी आपलं देखणं रूप सतत वाखाणत रहावं असा त्याचा आग्रह असे.

असाच आपलं प्रतिबिंब न्याहाळत नदीकाठावर पाणघोडा उभा असताना स्वतःशी म्हणाला, "वा: काय देखणा आहे मी! नाही तर तो हेंगाडमुस्का ससा. काय त्याचं झिपरं अंग, काय ते लांबोडके कान, काय ते थरथरणारं नाक, ते शेपटाचं थोटूक आणि त्या विद्रकल्याणी उड्या!"

दुर्दैवाची गोष्ट म्हणजे ससा त्या वेळी अगदी जवळच्या झुडुपात होता. त्यानं पाणघोड्याच्या तोंडची ही मुक्ताफळे ऐकली आणि तो फार संतापला, म्हणाला, "ह्याला गमभन शिकवलंच पाहिजे."

थोडा विचार केल्यावर सशानं वाळल्या मऊसूत गवताचा भारा गोळा करून एका चांगल्या झाडाच्या सावलीला टाकला आणि तो पाणघोड्याला म्हणाला, "अहो पाणघोडेराव, थंडीचे दिवस आलेत. रात्री फार गारवा असतो. तुमच्यासाठी मी उबदार बिछाना घातलाय. या."

पाणघोडा होकारार्थी मान हलवून म्हणाला, "सशा, सगळ्यांनी माझी काळजी घ्यावी असाच आहे मी. तुला हे कळलं ह्याचा आनंद आहे."

सशाला फार राग आला. तो मनाशी बोलला, काय गर्विष्ट प्राणी आहे हा पाणघोडा! जरा थांब बापू, मग बघ! आणि त्यानं बिछान्यावर आरामात झोपण्यासाठी पाणघोड्याला मदत केली.

मग ससा शेजारच्या खेडेगावाकडे पळाला. खेडूत नशापाणी करण्यात दंग आहेत आहेत असं बघून तो अन्न शिजविण्यासाठी पेटवलेल्या आगटीकडं गुपचूप गेला. तिथले निखारे उचलले. खापराच्या तुकड्यावर ते ठेवून तो पाणघोड्याकडे आला. दरम्यान पाणघोडा उबदार बिछान्यावर घोरत होता. हलकेच जवळ सरकून सशाने निखारे गवताच्या बिछान्यावर फेकले. फुंकून जाळ पेटवला. पाणघोड्याला जाग आली तेव्हा त्याच्या केसाळ अंगाला आग लागली होती. बिछान्याबाहेर धावताना सशाचं कुचकट हसणं पाणघोड्यानं ऐकलं.



पाणघोडा गोंधळून गेला. सुरूवातीला त्यानं अंग झोडून आग विझवण्याची खटपट केली. लवकरच आग कातड्यापर्यंत पोहोचली. वेदना शमविण्यासाठी पाणघोडा पाण्याकडे धावला. झाडाझुडुपात धावताना हिवाळ्यातल्या वाळलेल्या गवताला आग लागली आणि सगळा आजुबाजूचा परिसर पेटला. वेळेवर पाण्याशी पोहोचला म्हणून पाणघोड्याचा जीव बचावला. पाण्यात शिरताच आग विझली. कातडं थंडगार झालं. बाहेर लागलेली आग भडकत पाण्याच्या काठाशी येताच पाणघोडा परत पाण्यात बुडाला. श्वास घेण्यासाठी बाहेर आल्यावर त्याच्या नाकपुड्या आणि डोळे तेवढे पाण्याबाहेर राहिले.

जंगलाला लागलेली आग बराच वेळ राहिली आणि शेवटी विझली. पाणघोडा पाण्याबाहेर आला. त्याचं अंग ताठून गेलं होतं, ठणकतही होतं, पण जीव वाचला होता.

कधी एकदा सशाला गाठून बदडतो असं पाणघोड्याला झालं.

आपल्या रूपाला न्याहाळाची सवय काही विसरली नव्हतीच. पाण्यातलं प्रतिबिंब बघताच पाणघोड्याला धक्का बसला. प्रतिबिंबातला प्राणी गुलाबी राखाडी, कातडी घड्या असलेला, गुळगुळीत



अंगाचा होता. पाणघोड्याचा आपला डोळ्यांवर विश्वास बसेना. त्याची सुरेख गोंडेदार शेपटी नाहीशी झाली होती. अंगावरचे दाट मऊ केस जळून गेले होते. केसाळ कानाच्या जागी विद्रूप गोल, गुलाबी कान होते. पायावरची लव नाहीशी झाल्यामुळे ते आखूड दांड्यासारखे दिसत होते. फरे चरबीने ओघळून लोंबत होते.

पाणघोडा भयभीत झाला. त्याच्या मनाला फार वेदना झाल्या. तो शरमिंधा झाला आणि विलक्षण गोंधळून गेला.

आपल अंग कुणाला दिसू नये म्हणून, अभद्र रूपाची शरम वाटून त्यानं डोळ्यातून पाणी गाळलं आणि तो पाण्यात बुडाला. डोळे आणि नाकपुड्या तेवढ्या त्यानं पाण्यावर दिसू दिल्या. अन् पाणघोडा असाच कायम राहू लागला. तो नदीतळ्यातला प्राणी झाला. फक्त रात्रीच्या अंधारात कोणी पहाणार नाही अशा वेळीच पाण्याबाहेर येऊन जंगलाच्या कडेकडेला हिंडू लागला.

पण, झाल्या ह्या गोष्टीला इतकी वर्षे होऊन गेलीत. आता कुणाला आठवत नाही की, कोणे एके काळी पाणघोडा हा सुरेख केसाळ प्राणी होता.

**पाणघोड्याविषयी माहिती**

**जात :**

**पाणघोडा ( *Hippopotamus amphibius* )**

वीसपर्यंत पाणघोडे असलेल्या कळपात हा रहात असतो.



| | नर | मादी |
|---|---|---|
| उंची | 5 फूट | 4 फूट |
| वजन | 3,000 किलो | 2,000 किलो |
| जन्मल्यानंतरचे वजन | 30 किलो | 30 किलो |
| आईला पिणे | 1 वर्ष | 1 वर्ष |
| वयात येणे | 7 वर्षे | 4 वर्षे |
| गाभण काळ | — | 8 महिने |
| पिल्लांची संख्या | — | 1 |
| आयुष्य | 30 वर्षे | 30 वर्षे |

**ओळख :** हा प्राणी महाकाय आणि दिसायला कुरूप असतो. डोके भले मोठे, चौकोनी. रूंद मुस्कट. लहान कान. अरूंद नाकपुड्या. ह्या नाकपुड्या पाणघोडा पाण्याखाली जाताच बंद होतात. गडद हुरमुजी रंगापासून ते राखाडी काळ्यापर्यंत रंग असतो. डोळ्याभोवती गुलाबी रंग असतो. चेहऱ्याच्या दोन्ही बाजू व पोटाखालील भाग पांढरा असतो.

**जन्मस्थान :** सभोवार झाडेझुडपे, हिरवळ असलेली नदी, पाणथळ जागा, तळी.

**सवयी :** पाणघोडा हे नाव दोन ग्रीक शब्दापासून झाले आहे, 'घोडा' आणि 'नदी'. पाणघोड्याचा बहुतेक वेळ पाण्यात किंवा पाण्याशेजारी जातो. दिवसा सरन्यात लोळणे, वाळूत पसरणे आणि उन खाणे ही त्याची सवय आहे. रात्री पाण्याबाहेर पडून नदीकाठावर ते चरतात. चारा शोधत लांब लांब जातात. धोक्याची चाहूल लागताच, आडवे येईल त्याला उधळून टाकत ते पाण्यात शिरतात. म्हणून पाणघोडा आणि पाणी ह्या दोन्हीत शहाण्याने आडवे येऊ नये.

चार ते पाच मिनिटे पाणघोडे पाण्याखाली बुडून राहू शकतात. कोणी पीडा देऊ लागले तर नाकपुड्या तेवढ्या पाण्याबाहेर काढतात. काही वेळा डोके पाण्याबाहेर काढून नाकपुड्यातून फवारा सोडतात आणि डुरकतात. पाणघोडे उत्तम पोहतात. तळ्याच्या किंवा नदीच्या पाण्याखाली ते तळावरून चालतही जाऊ शकतात. त्यांच्या अवजड भारामुळे हे त्यांना सहज जमते. पाण्याचे प्रवाह अडू न देता ते वहाते ठेवण्याचे, पर्यावरणाचे महत्त्वाचे काम पाणघोडे करतात.

**अन्न :** पाणघोडे शाकाहारी आहेत. गवत, बारीक बोरू हे त्यांचे खाद्य आहे. आपल्या घट्ट व कणखर ओठांमुळे ते गवत, बोरू सहज कातरू शकतात.

**वेत :** पाणघोडीचे शिंगरु जमिनीवर जन्मते. बहुदा एकटेच. पाणघोड्या चांगल्या आया असतात. शिंगरु ठेवलेल्या जागेपासून त्या मगरींना पळवून लावतात. शिंगरुंना पोहायला, राडीत लोळण घ्यायला शिकवतात. पाण्यात शिंगरांना पाठीवर घेऊन पोहतात.



# जेव्हा रानम्हैसे शिकारी होते

(बुशमन लोकांमधील कथा)

*बुशमन लोकांच्या पूर्वापार कहाण्यात असे सांगितलेले आहे की रानम्हैसा एके काळी मांसाहारी प्राणी होता आणि ह्याच्या शिकारकौशल्याला सगळेजण वचकून असत.*

कोणे एके काळी एक भयंकर दांडगा रानम्हैसा मोठ्या दलदलीच्या काठी रहात होता. हा कसबी आणि ताकदवान शिकारी होता. त्याची भूकही दांडगी होती. जंगलातले सगळे प्राणी ह्या म्हैशाला भिऊन असत. हत्ती व गेंडा ह्या दोनच प्राण्यांना त्याच्या जीवघेण्या हल्ल्याची भीती नव्हती.

एकदा सिंहाला झऱ्यावर पाणी पीत असताना ह्या म्हैशानं गाठलं. सिंहाला काही चाहूल लागली नव्हती. शिंगाच्या एका जबरदस्त दणक्यासरशी म्हैसा सिंहाला ठार मारणार तोच सिंहानं त्याला पाहिलं आणि दयेची भीक मागितली. ती म्हैशानं एका अटीवर मानली. इथून पुढे सिंहानं म्हैशाच्या गुलामीत रहावं आणि रोज त्याला शिकार मारून आणून खायला घालावी.

सिंह लगेच म्हणाला, "आज्ञा हुजूर!" त्याला दुसरी वाटच नव्हती.

मग लगोलग म्हैशानं आज्ञा केली, " तळ्याच्या पलीकडच्या काठावर लठ्ठ काळवीट चरताना दिसले? त्याला मारून आण."

सिंहानं काळविटावर झडप घातली आणि त्याला ओढून आणून म्हैशासमोर टाकलं.

फुकट पुढ्यात येऊन पडलेलं ते जेवण म्हैशानं चवीनं खाल्लं. मनाशी बोलला, "ही व्यवस्था अगदी चोख झाली बरं का. आता रोज दुपारी राडीत लोळण घ्यायला मला वेळच वेळ मिळेल. पाहिजे तेव्हा झाडाच्या सावलीला झोपायला येईल."

दुसऱ्या दिवशी सकाळी न्याहारीची वेळ झाली तेव्हा म्हैशानं सिंहाला कोवळा झेब्रा मारून आणण्याचा हुकूम सोडला.

सिंहानं झेब्रा आणताच म्हैशानं आधाशासारखा आखा झेब्रा फस्त केला. सिंहाला काही ठेवलं नाही. केलेल्या कामाचे बक्षिस म्हणून एक हातभर हाडूकसुद्धा सिंहासमोर टाकलं नाही.

पुढे म्हैसा रोज सिंहाला गाठायचा, जास्तीतजास्त प्राणी मारून आणायला फर्मावायचा आणि आपली आधाशी भूक भागवायचा. त्यानं चुकूनही कधी सिंहापुढे एक घासही टाकला नाही.

म्हैशाला शिकार मारून देण्याच्या कामात कुटुंबातला कर्ता गुंतल्यामुळे सिंहाच्या सिंहीणी आणि पिल्लांना शिकार मिळणं अवघड झालं. काही पिल्लं उपाशी राहू लागली. तिकडे सिंहाच्या कुटुंबातले प्राणी हडकुळे होऊ लागले. कुटुंबातल्या प्राण्याची संख्या कमी कमी होऊ लागली.

आणि इकडे म्हैसा गलेलठ्ठ, जास्त आधाशी झाला. दिवसातून पाच वेळा जेवण करू लागला. त्याला खाणं पुरवता पुरवता सिंह बेजार झाला. एके दिवशी थकला भागलेला सिंह बाभळीच्या सावलीला पडलेला असताना म्हैसा आला. जंगी शिकारीची तयारी करायला त्यानं सिंहाला हुकूम केला.

आता म्हैसा खाऊन खाऊन प्रचंड गलेलठ्ठ झालेला होता. त्याला धड चालवतही नव्हतं. पण त्याची भूक मात्र फार वाढली होती. तो सिंहाला म्हणाला, "बरं का रे सिंहा, आज तू प्रत्येक जातीचा एक एक प्राणी माझ्यासाठी मारून आण."

सिंह मनाशी म्हणाला, "हे फार झालं." थकून गेलेल्या सिंहाला आता हे काम अशक्यच होतं. तो म्हैशाला म्हणाला, "हे महाबळी! समंजस व्हा! मला जमणार नाही हे." असं म्हणून आपलं काळं विपुल आयाळ सिंहानं झिंजाडलं.

तो पुढे म्हणाला, "माझ्या कुटुंबाकडे बघा. उपाशी मरताहेत सगळे. मला सवडच नाही त्यांना शिकारीत मदत करण्याची. हे बलाढ्य रानरेड्या. मी तुझी याचना करतो. माझी सुटका कर दिलेल्या शब्दातून."

पण म्हैशाची हाव फार मोठी होती आणि त्याच्यापाशी मुळीच दया नव्हती.

"मी तुला जीवदान दिलंय," म्हैसा गरजला, "आता मान सांभाळायचा तर तू मला दिलेला शब्द पाळलाच पाहिजेस." असं म्हणून त्याने आपल्या भल्या मोठ्या पुढच्या पायानं जमीन ठोकली. धुरोळ्याचा ढग उठला.

सिंहाला वाटलं आता मान नाही आणि अपमान नाही. आता योग्य अशी कृतीच केली पाहिजे. तो थकून गेल्यासारखा पुढे झाला आणि म्हैशाला म्हणाला, "रेडोबा, दिला शब्द पाळायला मी बांधलेला आहे. भलतीच हाव सुटून तू हुकूम केला आहेस की, 'प्रत्येक जातीतील जनावर मारून माझ्यापुढे टाक.' मानलं मी. मग आता तुझ्यापासूनच बोहनी करतो." असं बोलून सिंहाने म्हैशावर उडी घेतली आणि त्याच्या गलेलठ्ठ मानेत आपले धारदार सुळे घुसवले. म्हैसा मरून पडला.

सिंहाला, त्याच्या कुटुंबाला, पोटभर मेजवानी मिळाली. त्या दिवसापासून सगळ्यांना म्हसराच्या मांसाची चव आवडायला लागली. जेव्हा मिळेल तेव्हा ते रानम्हसराची शिकार करू लागले.

त्या दिवसापासून बाकीच्या रानम्हसरांनी धडा घेतला. मांस खाणं टाकून ते गवत खाऊ लागले. एकटं दुकटं रहाण्यापेक्षा कळपात रहाण्यात वनराज सिंहापासून कमी धोका असतो असाही त्यांनी एकमतानं निर्णय घेतला.

**रानम्हशीविषयी माहिती**

**जात :**

**म्हैस (*Syncerus caffer*)**

तरणेबांड रेडे कळप करून रहातात किंवा एकटे जगतात. माद्या शंभरापासून हजारापर्यंत कळपाने रहातात. नर आणि माद्या ह्या दोघांनाही शिंगे असतात.



| | नर | मादी |
|---|---|---|
| उंची | 5 फूट 4 इंच | 5 फूट |
| वजन | 700 किलो | 600 किलो |
| जन्मल्यानंतरचे वजन | 40 किलो | 40 किलो |
| आईला पिणे | 1 वर्ष | 1 वर्ष |
| वयात येणे | 8 वर्षे | 4 वर्षे |
| गाभण काळ | — | 11 महिने |
| पिल्लांची संख्या | — | 1 |
| आयुष्य | 20 वर्षे | 20 वर्षे |

**ओळख :** रानम्हैसा आणि म्हशी अंगापिंडाने मोठ्या, भक्कम, अविनाशी दिसतात. त्या विलक्षण कणखर असतात. पाळीव म्हशीच्या मानाने ह्यांचे पाय थोडे आखूड असतात. ह्यांचा माथा थोराड आणि सपाट असतो. माथ्यावर असलेल्या संरक्षक कवचातून ह्यांना भली थोरली काळपट शिंगे फुटलेली असतात.

**जन्मस्थान :** डोंगर उतार, घनदाट अरण्य, मोकळी माळराने ह्यासारख्या जागी रानम्हैस असते. मात्र तिथे एक गोष्ट पाहिजेच, ते म्हणजे भरपूर पाणी. म्हशींना रोज प्यायला पाणी लागते.

**सवयी :** रानम्हसरांना एकच कायमचा शत्रू आहे. तो म्हणजे सिंह. म्हशी, रेडके आणि एकुलता रेडा ह्यांना गाठून सिंह मारतो आणि खातो. ह्यांच्याशी सिंहाला झटापटही मोठी करावी लागते. रेड्याकडून जबर जखमी झालेले, मारले गेलेले सिंह दिसणे ही नेहमीची गोष्ट आहे. हिरव्या गवतापाशी पोहोचण्यासाठी पोहत नदीच्या प्रवाहापलीकडे चाललेले रेडे मगरीकडूनही कधी कधी मारले जातात.

धोकादायक समजल्या जाणाऱ्या इतर अनेक वन्य प्राण्यांप्रमाणे, कुरापत न काढलेली रानम्हसरेही गरीब, त्रास न देणारी असतात. त्यांना घाबरवणारे, भिववणारे असे काही केले तर मात्र ती जीवावर उठतात. त्यांची नजर तीक्ष्ण नाही. पण ती उणीव, सूक्ष्म वास, अतितिखट कान आणि कावेबाजपणा ह्याने ती भरून काढतात.

**अन्न :** रानम्हसरे ही नदी, ओढे, तळी ह्याच्या काठांवर उगवणाऱ्या हिरव्यागार गवतावर पोसतात. दुष्काळात त्यांना झाडेझुडी आणि वेली ओरबाडून डहाळे व पाने खावी लागतात.

**वेत :** ठराविक असा काळ नाही. पण जुलै ते सप्टेंबर ह्या काळात रेडके जन्मण्याचा उच्च बिंदू गाठला जातो.



# बॅबून माकडाने बिबळ्यावर कडी केली

(झुलू लोकांमधील कथा)

कोणे एके काळी बॅबून माकडाची आणि बिबळ्याची जानी दोस्ती होती. एके दिवशी बिबळ्यानं ससा ताणला. (बिबळ्या सशाचा पाठलाग का करतो हे तुम्ही जाणताच.) ससा टणाटण उड्या घेत पळाला आणि बिबळ्याच्या तावडीतून सुटण्यासाठी वारूळाच्या भोकात शिरून दडला. बिबळ्यानं आपल्या दोस्ताला म्हणजे बॅबून माकडाला बोलावलं आणि सांगितलं, "ह्या सशावर लक्ष ठेव. तंवर मी नदीवर पाणी पिऊन येतो."

माकड म्हणालं, "बरायं" आणि बिळाच्या कडेला वारूळाच्या भिंतीला टेकून बसलं. उन्हाळ्याचे दिवस होते. सकाळ संपून दुपार येत होती. लवकरच वारूळाला टेकून बसलेलं माकड पेंगू लागलं, सावकाश घोरू लागलं.

माकडाच्या घोरण्याचा आवाज सशानं ऐकला आणि हळूच बिळाबाहेर पडून तो धूम पळाला. त्याच वेळी पाणी पिऊन बिबळ्या परत येत होता. सशाला टेकडीपलीकडे उडी टाकून नाहीसं होताना त्यानं पाहिलं.

बिबळ्यानं रागानं माकडाला एक कानफटात देऊन जागं केलं आणि तो ओरडला, "अरे भिक्कारड्या माकडा, (हा विलक्षण असा अपमान होता. बॅबूनला आपल्याला कोणी माकड म्हटलं की फार राग यायचा.) तू जाऊ दिलंस त्या लठ्ठ सशाला? माझं दुपारचं जेवण गमावलंस की रे वांडरा!" बिबळ्याचे डोळे रागानं विस्तवासारखे फुलले.

भुकेलेला, रागावलेला बिबळ्या हा समोर कोणी निर्धास्त उभं रहावं असा प्राणी नसतो. बॅबून भ्याला. मागं सरला. पण बिबळ्या आता त्याला सोडणार नव्हता. त्यानं बॅबूनला पंजात धरला. चिडीनं त्याला आणखी अद्वातद्वा बोलणार, एवढ्यात दोन्ही पंजात धरलेल्या बॅबूनच्या उष्ण अंगाचा स्पर्श त्याला जाणवला. त्याचा शब्द अर्धवट तोंडातच राहिला. बिबळ्याचे डोळे चमकले. त्यानं जिभल्या चाटल्या.

"हा! माझ्या तोंडातला घास काढलास. आता तुझाच घास करतो की रे," असं बोलून बिबळ्यानं आपल्या मित्राला खाऊन टाकण्यासाठी जबडा उघडला.

"ईऽ", बॅबून ओरडला, "अरे देखण्या मित्रा, माझ्या अपराधाची फेड मला रीतसर पद्धतीनं तरी करू दे. तुला माहीत नाही का, बॅबूनला उत्तम मरण येणं म्हणजे त्याला कोणीतरी उपकारकर्त्यानं उंचावरून खाली टाकणं. अशानं आमचे अनेक तुकडे होतात आणि आमच्या शिकाऱ्याला मऊसूत, खायला सोपं अस मांस मिळतं."

बिबळ्या चकीत झाला. थांबून विचार करू लागला. पण बॅबूननं त्याला विचार करायला वेळ दिलाच नाही. त्याची वटवट चालूच राहिली, "मला वर झाडाकडं तरी फेक. खाली आदळलो की मी पिकलेल्या खरबुजासारखा फुटेन."

बिबळ्याला मोह झाला. त्याने बॅबूनला उंच झाडावर फेकले.

त्यासरशी बॅबून झपाट्यानं शेंड्यावरच्या गर्द विस्तारात गेला. हसायला लागला. आरडून ओरडून शिवीगाळी करत राहिला. वाईट वखट बोलत राहिला. 'लूत भरलेलं जनावर' असंसुद्धा तो बिबळ्याला म्हणाला. बिबळ्याचे डोळे संतापानं विस्तवासारखे फुलले.

बॅबूनच्या वटवटीमुळं आजबाजूचे प्राणी येऊ लागले. हा तमाशा मानी बिबळ्याला असह्य झाला. एक झेप टाकून तो जंगलात दिसेनासा झाला.

हा अपमान बिबळ्या कधीही विसरला नाही. आजसुद्धा इतर प्राणी सोडून बिबळ्या बॅबूनलाच पकडून खातो. आणि बिबळ्या दिसला रे दिसला की बॅबून रडाभेकायला लागतात.

झिंबाब्वेच्या शोना टोळीवाल्यात बॅबूनसंबंधी एक समज आहे. चेटूक करणाऱ्या मांत्रिकाचा म्हणे बॅबून हस्तक असतो. ज्यांच लोकांकडं येणं थकलेलं असतं ते लोक इन्गान्गाला (चेटक्याला) खाणं देऊन त्याच्याकडून देणं वसूल करायला बॅबूनला पाठवतात. बॅबून पाहिजे त्या भाषेत बोलू शकतो. कुणाकडं गुरं येणं असलं तर बॅबून काही सबब ऐकून घेत नाही. न सांगता सवरता गुप्तपणे गुरं घेऊन जातो.

बॅबूनसंबंधी अशी समजूत असण्याचं कारण बघितलं तर तो दिसायला अगदी माणसासारखा दिसतो, हे एक. शिवाय तो धूर्त आहे आणि दिसायला भीती वाटावी असा आहे.



**बॅबून माकडाविषयी माहिती**

**जात :**

**चॅक्म बॅबून *(Papio ursinus)***

हे टोळी करून रहातात.

यांची दहा ते दोनशेची टोळी असते.




| | नर | मादी |
|---|---|---|
| उंची | 3 फूट 3 इंच | 2 फूट 7 इंच |
| वजन | 30 किलो | 18 किलो |
| जन्मल्यानंतरचे वजन | 250 ग्रॅम | 250 ग्रॅम |
| आईला पिणे | 6 महिने | 6 महिने |
| वयात येणे | 5 वर्षे | 3 वर्षे |
| गाभण काळ | — | 6 -7 महिने |
| पिल्लांची संख्या | — | 1 |
| आयुष्य | 25 वर्षे | 25 वर्षे |

**ओळख :** इतर माकडातून बॅबून माकड हे सहज ओळखता येते. ती थोराड असतात आणि चौकोनी आकाराचे त्यांचे मुस्कट कुत्र्यासारखे लांबोडके आणि पुढे निघालेले असते. अंगावरती तपकिरी हिरवट रंगाचे केस असतात. हे राठ केस डोक्यावर दाट रंगाचे, कण्यावरही दाट रंगाचे असतात. त्याची लांबी एक फुटापर्यंत असू शकते.

**जन्मस्थान :** अरण्य. विशेष करून अरण्यातील खडका दगडांचा प्रदेश.

**सवयी :** अंगाने दांडगी, सामर्थ्यवान, डोकेबाज अशी ही माकडे टोळीने मोठ्या शिस्तशीर पद्धतीने रहातात. जसे खाणे उपलब्ध असेल तशी टोळीतील माकडांची संख्या, दहापासून दोनशेपर्यंत असते. बॅबून झोपण्यासाठी झाडावर घरटी करीत असोत, खाणे खात असोत, एका जागेवरून उठून दुसरीकडे त्यांचा प्रवास चाललेला असो, त्यावेळी टोळीतील हुप्पे, लेकुरवाळ्या आया, पिल्ले ही टोळीच्या मध्यभागी रहातात. अशक्त नर, पिल्ले नसलेलल्या माद्या, आणि वयात येऊ घातलेल्या पोरी आणि पोरे मध्ये असलेल्यांच्या सभोवार चरत, खेळत रहातात. हे टेहेळणी करण्याचे काम करतात.

बॅबूनची एखादी टोळी पाण्यावर येते तेव्हा ते दृश्य पहाण्यासारखे असते.

हुप्पे आसपासच्या झाडावर चढून बसतात आणि सभोवार काही धोका आहे का याच्यावर नजर ठेवतात. काही दिसले तर ते गप्प रहातात. बाकी सर्व टोळी भराभर पाण्याकडे जाते. तिथे जर काळविटासारखे प्राणी खोळंबून वाट बघत थांबलेले असतील तर बॅबून टोळीबरोबर पाण्यावर जाऊन निर्धास्तपणे तहान भागवतात.

**अन्न :** खाण्याच्या बाबतीत बॅबून माकडे ही माणसासारखीच आहेत. ती मांस, भाजीपाला, फळे, आणि चावून खाण्याजोगे जे जे मिळेल ते आनंदाने खातात. तशी ती शाकाहारीच म्हटली पाहिजेत. कारण खाण्यात येणाऱ्या पदार्थांत जास्तीत जास्त गवत असते. ह्याला पूरक म्हणजे बिया. कोंभ, मुळे, हे ते जमीन उकरून काढतात. कळ्या, फुले आणि फळेसुद्धा ती फस्त करतात.

**वेत :** ही टोळीत राहूनच होते. हंगामात माद्या प्रथम दुय्यम दर्जाच्या हुप्याशी आणि मग प्रमुख हुप्याशी जुगतात. वीण वर्षभर चालूच असते.





# जिराफ आणि गोचीडवेच्या पाखरू हे दोस्त कसे झाले

(बुशमन लोकांमधील एक दंतकथा)

कोणे एके काळी ह्या पृथ्वीवर माणूस नव्हता. सगळे प्राणी एकत्र राहून शांततेत जगत होते. एके दिवशी वीज पडून वणवा लागला. सगळीकडे जाळपोळ सुरू झाली. वाळल्या गवताने पेट घेतला. पावसाआधी येणारे जोरदार वारे लागून आग पसरली आणि ह्या क्षितिजापासून त्या क्षितिजापर्यंत ज्वाळांची भिंत दिसू लागली. हा वणवा विझवणं जनावरांना शक्यच नव्हतं. ती भिऊन वाट मिळेल तिकडे पळू लागली.

गोचीडवेच्या पाखरांच्या एका जोडीनं झाडाच्या ढोलीत घरटं करून त्यात अंडी उबवली होती. घरट्यात लहान पिल्लं होती. वणवा व जाळ ह्या झाडाच्या दिशेनं येत होता. पळणाऱ्या जनावरांना ही पाखरं विनवीत होती, “आम्हाला पिल्लं वाचवायला मदत करा.” पण सुसाट पळणाऱ्या जनावरांपैकी कोणी त्यांचे ऐकूनही घेतलं नाही. गोचीडवेच्या पाखरांची जोडी निराश होऊन बसली असताना दयाळू जिराफानं हे पाहिलं आणि विचारलं, “काय झालं, असे हताश का बसलात?”

“अरे बाबा जिराफा, आमचं घरटं आता लवकरच आगीत सापडून जळेल. आमची बाळं आहेत त्यात. दया कर आमच्यावर. त्यांना सोडव आगीच्या तडाख्यातनं.”

जिराफाला कणव आली. धुराच्या लोटात, उडणाऱ्या ठिणग्यात तो शिरला. त्याचे पाय लांब, त्याची मान लांब. त्यामुळे झाडाच्या शेंड्याला सहज पोचला. त्यानं ढोलीतून घरटं पिल्लांसकट बाहेर काढलं. पिल्लं फारच लहान होती. त्यांच्या अंगावर नुकतीच लव फुटलेली होती. जिराफानं त्यांना सुरक्षित ठिकाणी नेलं.



पिल्लांच्या आईला बापाला फार बरं वाटलं. ते म्हणाले. "मेहेरबानी झाली. कसे उपकार फेडावे तुमचे?" जिराफ म्हणाला, "एक काम करा माझं. गोचीडं मला फार हैराण करतात. माझ्या पाठीवर बसा. माझ्याबरोबर रहा आणि तेवढे गोचीड वेचा. बास्."

"हे तुमच काम आम्ही आनंदानं सतत करत राहू." ती पाखरं म्हणाली.

तुम्ही आजही कधी आफ्रिकेच्या जंगलात गेलात तर जिराफाच्या पाठीवर बसलेले गोचीडवेचे पक्षी तुम्हाला दिसतील. ते जिराफाच्या मानेला, फऱ्याला, कानांना लटकून गोचीडे वेचीत असतात. दिलेला शब्द पाळतात.

# जिराफाची मान लांब का झाली

(पूर्व आफ्रिकेतील एक कथा)

सृष्टिनिर्मात्याने इतर जनावरांना दिली होती तशीच मान आणि तसेच पाय जिराफालाही दिले होते. जिराफ हा दिसायला एलंड आणि कुडू जातीच्या काळविटांसारखाच होता.

सगळं नीट चाललेलं होतं. पण मधेच एका वर्षी भयाण दुष्काळ पडला. गवत, झाडपाला, वेली जनावरांनी केव्हाच ओरबाडून संपवल्या. कडवट चव आणि वाईट वास असलेल्या गवताचे पिवळे डुंबे आणि वाळक्या काटक्याकुटक्या ह्याखेरीज काहीही उरलं नाही.

जनावरात मोठी चढाओढ सुरू झाली. चरणं आणि पाणी पिणं ह्यासाठी रोज अनेक मैलांची मजल त्यांना मारावी लागे. अशा कठीण काळात तगडी जनावरं तेवढी जगतात, दुबळी मरून जातात.

एके दिवशी जिराफ आपल्या मित्राला, गेंड्याला भेटला. उष्ण वावटळी उठताहेत, आभाळाकडे मृगजळ चमचमतंय अशा उजाड मैदानात हे दोघं भेटले. झऱ्याकडं जाणाऱ्या वाटेनं पायपीट चालली असताना त्यांची आपसात वाईट काळाची भाषा झाली.

"मित्रा," जिराफ बोलला. कशी जत्रा भरलीय इथं बघ. सगळे खायला हुडकताहेत ते गवत. ह्यांच्या खुरांनी आता ते धुरोळ्याखाली गाडले जाईल. आणि त्या तिकडं त्या उंच बाभळी बघ...."

"ओम्फ्" गेंडा बोंबलला. (चांगलं बोलणं हे गेंड्याला कधीच जमलं नाही, आजही जमत नाही.) जिराफ म्हणाला, "बाभळीच्या शेंड्याला असलेली कोवळी कोवळी पानं खाता आली असती तर किती बरं होतं. बाभळीच्या शेंड्यावर रग्गड खायला आहे. पण काय उपयोग? मला झाडावर चढायला येत नाही. तुलाही येतं असं दिसलं नाही कधी."

गेंडा म्हणाला, "नाही रे, मला नाही येत." आपल्या अधू डोळ्यांनी तिरके बघत गेंड्यानं बाभळीचा हिरवा विस्तार न्याहाळत कबुली दिली. तो पुढे म्हणाला, "मला वाटतं आपण मांत्रिकाकडं जावं. तो शहाणा आणि ताकदीचा आहे." एवढं बोलून एक काटकी चघळत गेंडा विचार करू लागला.

जिराफ म्हणाला, "तुझी कल्पना चांगली आहे. कसं जायचं? मित्रा, तुला वाटतं त्याची मदत मिळेल आपल्याला?"

दिवस मावळायला हे दोघे मित्र निघाले. वाटेवरच्या झऱ्यातलं गढूळ पाणी पिऊन त्यांनी तहान भागवली.

सबंध रात्र आणि दुसरा तिसरा प्रहरपर्यंतचा दिवस चालून जिराफानं आणि गेंड्यानं मांत्रिकाची वस्ती शोधून काढली. त्याच्या समोर आपली अडचण मांडली.

मांत्रिक हसून बोलला, "फारच सोपं आहे. उद्या दुपारी इथं या. मी तुम्हा दोघांना मंतरलेला झाडपाला खायला देतो. तो खाल्ल्यावर तुमचे पाय, तुमच्या माना अशा लांबतील की तुम्हाला झाडांच्या शेंड्यावरचा कोवळा पाला सहज खाता येईल!"

हे एवढं सांगून मांत्रिक झाडपाला मंतरण्याच्या खटाटोपाला लागला. गेंडा आणि जिराफ विलक्षण उल्हसित होऊन झऱ्याकडे धावले.

दुसऱ्या दिवशी फक्त जिराफच मांत्रिकाच्या झोपडीच्या दारात आला. दिलेल्या वेळेवर पोचला. कमी डोक्याचा बापडा गेंडा. त्याला इतर जनावरांच्या नजरेतून वाचलेला छान हिरव्या गवताचा डवंगा दिसला. दुपारी आपल्याला मांत्रिकाकडे जायचे आहे हे साफ विसरून गेंडा गवत खाण्यात रमला.

काही वेळ गेंड्याच्या येण्याची वाट पाहिल्यावर मांत्रिक कंटाळला. जिराफालाच सगळा झाडपाला देऊन तो आपल्या झोपडीत शिरला.

जिराफाने सगळा मंतरलेला झाडपाला खाल्ला. त्याच्या चारी पायात आणि मानेत काही विलक्षण झिणझिण्या जाणवू लागल्या. जिराफाने डोळे मिटले आणि पुन्हा उघडले तर त्याच्या पायाखालची जमीन दूरदूर चालली होती. असं का बरं वाटावं? गंमतच आहे.

जिराफाने घाबरून डोळे मिटले. घेरी आल्यासारखे झाले. मग त्यानं डोळे उघडून पाहिलं.

वाहवा! आजूबाजूचं जग बदललेलं दिसलं. जिराफ उंच उंच वाढला होता. केवढा तरी प्रदेश सहज दृष्टीच्या टप्प्यात येत होता. जिराफानं खाली आपल्या लांबलांब पायाकडं पाहिलं, आपल्या लांब मानेकडं पाहिलं. त्याला हसू आलं. आता बाभळीचे हिरवेगार शेंडे डोळ्यांसमोरच होते. अगदी दोन ढांगा टाकताच तोंडात येतील असे जवळ. मांत्रिकाची जादू अद्‌भुतपणे कामाला आली होती.

इकडे गवत खाता खाता गेंड्याच्या एकदम लक्षात आलं, अरे, आपल्याला मांत्रिकाच्या झोपडीत जायचं होतं. दुडक्या चालीनं तो लगेच सुटला आणि मांत्रिकाच्या झोपडीकडं आला.

पण आता फार वेळ झाला होता. लांब पायांचा, उंच मानेचा रूबाबदार जिराफ बाभळीच्या हिरव्यागार शेंड्यावर मस्त चरत होता. त्याच्याशी स्पर्धा करायला कोणतही जनावर नव्हतं.

गेंड्याला मांत्रिकाने सांगितलं की, "बाबारे, आता मंतरलेला झाडापाला संपला. तुझ्यासाठी काही नाही." तेव्हा गेंड्याचं टाळकं फिरलं. नाकाडावरचं टोकदार शिंग उगारून त्यानं मंत्रिकाला लांबपर्यंत पळवलं. मांत्रिक पुढं आणि गेंडा त्याच्या मागं. असा जोरदार पाठलाग सुरू झाला. मांत्रिक भन्नाट धावत गर्द झाडीत दिसेनासा झाला.

आजही लोक म्हणतात माणूस दिसला की गेंड्याचं टाळकं फिरतं.

जिराफाला मिळालेल्या लांब आणि सुरेख मानेचं बक्षिस आठवून तो दिसेल त्या माणसामागं मांत्रिक समजून हल्ला करायला धावतो.

# आभाळातला जिराफ

( बुशमन लोकांमधील एक पुरातन दंतकथा )

आदिवासींचं म्हणणं आहे. काळ जेव्हापासून चालू झाला तेव्हा सूर्याला आपली आभाळातली वाट नीट माहीत नव्हती. प्रत्येक गोष्टीकडं कुतूहलानं टक लावून बघणं ही सवय जिराफाला होती.

सृष्टीनिर्मात्याला वाटलं की सूर्याकडं लक्ष देण्याची कामगिरी जिराफावर सोपवावी. त्याची नजर राहिली म्हणजेच सूर्य चुकून भलतीकडं जाणार नाही.

आपल्यावर सोपवलेली कामगिरी जिराफानं मनापासून बजावली. (त्यानं एवढी चोख नजर ठेवली की सूर्य कधीही भलत्या दिशेला गेला नाही.) जिराफाच्या कामगिरीवर निर्माता खुष झाला. त्याचा सत्कार करावा असं निर्मात्याच्या मनात आलं. आभाळातल्या काही चांदण्यांच्या मूळच्या जागा बदलून त्यानं त्या अशा पद्धतीनं मांडल्या की तो आकार जिराफाचा वाटावा. आजही आभाळात तुम्हाला जिराफ दिसतो.

आदिवासी ह्या चांदण्याच्या आकाराला टुटवा (जिराफ) म्हणतात. रात्री प्रवास करताना दिशा कळावी म्हणून ते ह्या आभाळातील खुणेचा उपयोग करतात. इंग्रजी बोलणारे लोक टुटवाला 'सदर्न क्रॉस' म्हणून ओळखतात आणि तेही दिशा कळण्यासाठीच त्याचा उपयोग करतात.

**जिराफाविषयी माहिती**

**जात :**

**जिराफ *(Giraffa camelopardalis)***

नर एकटे रहातात. माद्या कळपात रहातात.
एका कळपात वीसपर्यंत माद्या असतात.



| | **नर** | **मादी** |
|---|---|---|
| उंची | 18 फूट | 16 फूट |
| वजन | 1200 किलो | 900 किलो |
| जन्मल्यानंतरचे वजन | 100किलो | 100किलो |
| आईला पिणे | 6 महिने | 6 महिने |
| वयात येणे | 5 वर्षे | 4 वर्षे |
| गाभण काळ | — | 1 वर्ष 3 महिने |
| पिल्लांची संख्या | — | 1 |
| आयुष्य | 20 वर्षे | 20 वर्षे |

**ओळख :** लांबलचक मानेमुळे जिराफ हा प्राणी लगेच ओळखू येतो. सर्व जगातले हे उंच जनावर आहे. ह्याची उंची अठरा फूट असते. इतर जनावरांप्रमाणे ह्यालाही मानेचे सात मणके असतात. पण ते लांब लांब

असे असतात. ह्याची दोन शिंगे म्हणजे कातडी आणि केसाच्या आतील हाडेच असतात. ह्याच्या दोन्ही डोळ्यांच्यामध्येही हाड वाढलेले असते. कातडीचा रंग, कातडीवरच्या चौकटींचा आकार ह्यात फरक असतो. पण साधारणत: तांबडा हुरमुजी रंग आणि तीवर लहान मोठे पांढऱ्या किंवा फिक्कट तांबूस रंगाच्या रेखांनी आखलेले चौकोनी तुकडे अशी कातडी असते.

**जन्मस्थान :** सपाट गवताळ प्रदेशात जिराफ रहातात. इथे लहान झाडेझुडपे, बाभळीची झाडे असतात. गर्द अशा जंगलात जिराफ कधी आढळत नाहीत.

**सवयी :** लक्षावधी वर्षांपासून सुधारणा होत होत जिराफाची आज आहे ती लांब मान त्याला सपाट रानातल्या झाडाचे शेंडे खायला उपयोगी पडते. झाडांच्या डहाळ्या ओरबाडणाऱ्या इतर प्राण्यांशी त्याला चढाओढ करावी लागत नाही. शिवाय लांब मान आणि जास्ती उंची असल्यामुळे दूरवरचा धोका जिराफाला दिसतो. चरणारी, डहाळे ओरबाडणारी इतर जनावरे जिराफाच्या जवळपास असणे पत्करतात. जिराफ बुजून पहात राहिले की ही जनावरे सावध होऊन पळतात.

पाय लांबसडक असल्यामुळे जिराफाला वेगाने पळता येते. ताशी अठ्ठेचाळीस किलोमीटर (ताशी तीस मैल) असा त्याचा वेग असतो. जिवावर बेतल्यावर हे पायच त्याला संरक्षक असतात. दुसरे काहीही त्याच्यापाशी नाही. मागच्या लाथा हाणून जिराफ सिंहालासुद्धा ठार मारते. मागच्या दोन पायावर उभे राहून पुढच्या पायांच्या धारदार खुरांनीही जिराफ हल्लेखोराचा समाचार घेते.

पाणी प्यायच्या वेळी जिराफावर हल्ला होतो. कारण मान खाली करून पाण्याला तोंड लावण्यासाठी जिराफाला पाय फार फाकवावे लागतात. असे वाकलेले असताना चटकन उभे होणे त्याला जमत नाही. त्या वेळी सिंह पाठीवर झेप घेऊन जिराफाची शिकार साधतो. अशा वेळी, पाठीवरच्या सिंहाला खाली पाडण्यासाठी जिराफ दाट झाडाझुडपातून दौड घेतात. त्याची कातडी इतकी राठ आणि जाड असते की डहाळ्या, काटेरी फांद्या लागण्याने, ओरखडण्याने कातडीला काहीही होत नाही. कोवळ्या वयातले जिराफ बहुधा सिंहाच्या तावडीत सापडतात.

**अन्न :** अनेक प्रकारच्या उंच झाडांच्या शेंड्यावरची पाने, कोंभ हे जिराफाचे खाणे असते. ह्यांचा वरचा ओठ आणि जीभही बरीच लांबवली जाते. पाणी आसपास असेल तर जिराफ वारंवार पितात. नसेल तर पाण्याशिवाय बराच काळ राहू शकतात.

**वेत :** ठराविक असा वीण होण्याचा काळ नाही. एकच वासरू होते. दोन आठवड्यात ते झाडपाला खाऊ लागते. दिवसा वासरे एकत्र एका जागी ठेवून त्यांच्या आया चरायला जातात.



# पाणकाळविटाने मगरीला मदत का केली

(ओकावांगो प्रदेशातील माकुशू जमातीमधील कथा)

फार फार वर्षांमागे, ह्या पृथ्वीवर येताना माणसानं 'शिकार' हा प्रकार आपल्या बरोबर आणला. रानातली सगळी जनावरं सिंहाला भिऊन वागू लागली. सिंह हा सर्व प्राण्यांत श्रेष्ठ शिकारी होता.

माणूससुद्धा त्याच्या शक्तिला आणि कसबाला टरकून रहायचा.

ह्या सुरूवातीच्या काळात पाणकाळविटांचे कळप लहान असायचे आणि ते इतर प्राण्यांच्या कळपात मिळून मिसळून चरायचे. सिंह शिकारीसाठी बाहेर पडला की इतर जनावरं जसे भिऊन पळ काढीत तशी पाणकाळवीटंही पळ काढीत. 'सिंहाच्या शक्तीला, क्रौर्याला पुरून उरू' असा विश्वास फक्त महाकाय हत्तीला तेवढा असे. सिंह काही क्षणातच सावज धरी. त्याच्या बरोबर त्याचा गोतावळा असे. लहान मोठी अशी अनेक जनावरे ह्या मृगेंद्राच्या हल्ल्यात मारली जात.

एके दिवशी सिंहानं पाणकाळविटाच्या कळपावर हल्ला चढविला. बरीच पळापळ झाल्यावर सिंहाच्या तावडीतून एक काळवीट सुटलं. सपाट रान मागं टाकून ते पाणथळ आणि दाट जंगल असलेल्या प्रदेशात आलं होतं. बोरूच्या बेटामधून, कांगुण्या अंजीराच्या वनातून हिंडताना पाणकाळविटाने विचार केला, "उत्तम ठिकाण आहे हे रहायला. रग्गड खायला आहे. पाहिजे तेवढं पाणी आहे. महत्त्वाचं म्हणजे सिंहापासून दडून बचाव करता येईल असं जंगल आहे."

एवढ्यात पाणकाळविटाच्या कानावर आरोळ्या, किंकाळ्या आल्या. तळ्याकाठी भल्या थोरल्या मगरीवर वरच्या झाडाची जाड फांदी पडली होती. त्या मगरीला तो चांगला ओळखत होता. ही लबाड,

धूर्त मगर पट्टीची शिकारी होती. मैदानावरची जनावरं जशी सिंहाला भ्यायची तसे पाण्यातले प्राणी हिला भ्यायचे.

पाणकाळविटाला कणव आली. मगरीला सोडवण्याआधी त्यानं एक अट घातली. तो म्हणाला, "हे खवल्यावाले दांडगे, तू भली शक्तीशाली असशील. पण आता मी जर तुला इथं सोडून निघून गेलो तर तू मरशीलच, ही दगडावरची रेघ समज. मी तुला वाचवीन पण एका अटीवर!"

"तू जे म्हणशील ते मी करीन रे दयाळा! अरे बाबा, माझा जीव वाचल्यावर तुझ्या शब्दाला मान द्यायला मी जन्माची बांधली गेले की."

"हे बघ माझ्या मनाला येईल तेव्हा पाण्यात पडायला तू मला मोकळीक दिली पाहिजेस. मग उन्हाळ्यात अंग थंड करायला असो, का कोणी शत्रू पाठीमागं लागायला म्हणून असो. तुझ्या राज्यात मला निवांतपणा मिळाला पाहिजे."

मगरीनं तात्काळ ही अट मान्य केली. तिच्या अंगावर पडलेली फांदी जाडजूड आणि जडशीळ होती. पाणकाळवीटानं आपल्या बळकट शिंगांचा रेटा देऊन ती उचलली आणि अडकून पडलेली मगर सटकली.

ती पाण्यात शिरून नाहीशी होणार तेवढ्यात काळवीटानं बजावलं, "ए खवलेवाले, माझी ताकद तू बघितलीस. जर का दिला शब्द मोडलास तर गोष्ट बरी होणार नाही."

मगरीनं शपथ घेऊन पुन्हा सांगितलं, "मी शब्द पाळीन, तुझे उपकार कशी विसरेन?"

आजही कधी पाणकाळविटावर प्रसंग आला आणि सिंह पाठीमागं धावत असला की पाणकाळवीट पाण्यात शिरतो (मांजराच्या जातीचे सगळे प्राणी पाण्यात भिजण्याचा तिटकारा करतात. सावजामागं खोल पाण्यात शिरणं टाळतात.) मगरीपासून आपल्याला भीती नाही याची खात्री काळविटाला असतेच.

खरं म्हणजे पाणकाळविटाच्या शक्तीचा मगरीलाही धाकच वाटतो.

# पाणकाळविटाच्या अंगावर पांढरे वर्तुळ कसे आले

एका काळोख्या रात्री, आभाळात चंद्र नसताना, एक पाणकाळविटाची मादी आणि तिची पिल्लं आदिवासीच्या झोपडीजवळ चरत होती.

ह्या आदिवासीकडे कोणी पाव्हणा येणार होता म्हणून त्यानं घराला चुना देण्याचं काम काढलेलं होतं. दिवसभर काम करून, चुन्याचे भांडे त्यानं घराच्या बाहेर ठेवलेलं होतं.

घराजवळ चरणाऱ्या पाणकाळविटांपैकी एकाचा पाय अंधारात अचानक त्या भांड्याला लागला. त्या आवाजासरशी आदिवासीला जाग आली. त्यानं घराबाहेर येऊन बघितले तर तयार करून ठेवलेला त्यातला चुना सांडून गेलेला दिसला. आदिवासीला फार राग आला. तो पाणकाळविटांवर ओरडला आणि त्यांच्या मागं धावू लागला. मादी आणि पिल्लं चोहोकडं विखुरली आणि मिळेल त्या दिशेला पळत सुटली.

रागाच्या भरात आदिवासनं चुन्याचं भांडं उचललं आणि ते मादीकडं भिरकावलं. ते मादीच्या कुल्यांवर आदळलं आणि तिच्या कुल्यांवर भांड्याच्या तोंडाचं मोठं वर्तुळ उठलं.

ही गोष्ट फारच उपयोगाची ठरली. कारण अंधारात पिल्लांना आई कोणीकडे चाललीय हे कळायला लागलं आणि पिल्लं काही दगाफटका न होतो सुरक्षित अशी तिच्या मागोमाग जाऊ लागली.

मग पाणकाळविटांना कळलं की असं पांढर वर्तुळ ढुंगणावर असणं फारच फायद्याचं आहे. म्हणून त्यांनी ते राहू दिलं.

आणि त्या दिवसापासून आजतागायत, कोणीही स्वाभिमानी पाणकाळवीट मागल्या वर्तुळावाचून कधी रहात नाही.

## पाणकाळविटाविषयी माहिती

**जात :**

**साधे पाणकाळवीट *(Kobus ellipsiprymus)***

वीस जणांच्या कळपात वावरते.

फक्त नरांना शिंगे असतात.

| | नर | मादी |
|---|---|---|
| उंची | 4 फूट 4 इंच | 4 फूट |
| वजन | 250 किलो | 200 किलो |
| जन्मल्यानंतरचे वजन | 8 किलो | 8 किलो |
| आईला पिणे | 9 महिने | 9 महिने |
| वयात येणे | 2 वर्षे | 2 वर्षे |
| गाभण काळ | — | 8 महिने |
| पिल्लांची संख्या | — | 1 |
| आयुष्य | 10 वर्षे | 10 वर्षे |



**ओळख :** साधे पाणकाळवीट हे दांडगे, बळकट पाणकाळवीट आहे. नराला दोन लांब, उठावदार वळी असलेली, थोडी पुढे येऊन पाठीमागे झुकलेली, शेवटाला सरळ होणारी शिंगे असतात. अंगावर तांबडसर, किंवा राखाडी तपकिरी रंगाचे राठ केस असतात. मानेभोवती नराला आणि मादीलाही आयाळ असते. नजरेत भरणारी खूण म्हणजे पुठ्ठ्यावर शेपटाभोवती पांढरे वर्तुळ असते. प्रत्येक कानाच्या बुडापासून सुरू

होऊन गळ्याला वेढी असलेलेही पांढरे वर्तुळ असते. ही जात डिफासा किंवा सिंग सिंग पाणकाळविटासारखीच आहे. फरक एवढाच की डिफासांना पांढरी वर्तुळे नसतात. त्याच्या पुठ्ठ्याच्या आतील बाजूस रंग आणि पायांचा वरचा भाग पांढरा असतो.

**जन्मस्थान :** पाणकाळविटे ही नावाप्रमाणे पाण्याच्या जवळ सापडतात. तसेच, जिथे भरपूर झाडे व गवत आहे तिथे, आणि कुरणांच्या भागात ती असतात.

**सवयी :** पाणकाळविटे लहान कळपाने रहातात. कळपातील काळविटांची संख्या वीसच्या आसपास असते. काही वेळा अनेक कळप एकत्र येतात. थोडे दिवस एकत्र रहातात. एका नराला अनेक माद्या मिळतात. ह्या माद्यांपायी त्याला अनेक नरांशी भांडणे खेळावी लागतात. आपल्या उत्तम शिंगाचा वापर करून नर आपल्या वैऱ्याशी सामना देतो. आपल्या कुटुंबाचे संरक्षण करण्यासाठीही ही शिंगे त्याच्या कामी येतात. सिंह सोडून इतर हिंस्त्र पशू नरांवर  हल्ला करावयास धजत नाहीत. पण इतर काळविटे, पाडसे, माद्या यांच्यावर चित्ते, बिबटे आणि रानकुत्री हल्ला चढवून त्यांची शिकार करतात व त्यांना खातात.

चित्ते, बिबटे आणि रानकुत्री ह्यांच्यापासून बचाव करण्यासाठी पाणकाळविटे पुष्कळदा पाण्यात उड्या घेतात आणि नाकपुड्या पाण्याबाहेर ठेवून पाण्याखाली रहातात. नर काळवीट हे हल्लेखोरांना दूर ठेवण्यासाठी आपल्या उत्तम शिंगांचा वापर करतात.

ह्या काळविटांना मगरींचे भय नसते असे दिसते. एक विचार असा आहे की, काळविटांपाशी असलेल्या विलक्षण वासांमुळे मगरी दूर रहातात. काही तज्ज्ञ म्हणतात की, त्रासदायक असे चावरे कीटक आणि काळविटांचे रक्त पिऊन रहाणारे जीव ह्यांना मज्जाव करणे एवढेच ह्या वासांचे कार्य असते.

**अन्न :** गवत हेच प्रमुख खाद्य असते. विशेषतः पाणथळ जमिनीच्या आणि तळ्यांच्या काठावर फोफावणाऱ्या बोरूवजा गवतावर ह्यांचा भार असतो. काळविटे काही झाडेझडोऱ्यांची पानेही खातात.

**वेत :** वीण वर्षभर होतच रहाते. काही तज्ज्ञांचे मत आहे की, सप्टेंबर, ऑक्टोबर, नोव्हेंबर हाच तो काळ आहे. एकापेक्षा जास्ती पिल्ले क्वचित् होतात.



# पहिला झेब्रा

(मध्य आफ्रिकेतल्या अंगोनी लोकांमधील एक कथा)

पृथ्वीवर सगळंच नवं नवं होतं, तेव्हा सगळी जनावरे एकसारखी होती. ह्याची शिंगे वेगळी आहेत, त्याच्या अंगावरची कातडी चमकदार पिवळी तांबडी आहे आणि तिच्यावर काळे ठिपके आहेत असे काहीच नव्हते. सृष्टिनिर्माता निर्माण करीत असलेल्या विशाल व्यवस्थेला पूर्ण स्वरूप देण्यात गढलेला होता.

त्याने नाना शिंगे बनवली. आकार, लांबी, रूंदी ह्यात अफाट वेगवेगळेपणा ठेवला. नाना प्रकारची कातडी केली. केसाळ, रंगीबेरंगी, ठिपकेवाली, पट्टेवाली. काम झालं तेव्हा निर्मात्याने शिंगे, कातडी सरोवराच्या काठच्या एका गुहेत ठेवली.

मैदानावरच्या गवताळ कुरणात चरणाऱ्या सगळया जनांवरांकडे निर्मात्याने मग निरोप पाठवला. दुसऱ्या दिवशी सकाळी त्यांनी गुहेकडे जावे आणि पसंत पडतील ती शिंगे आणि कातडी-घेऊन जावीत. हा निरोप मिळताच जनावरांच्यात प्रचंड खळबळ उडाली. निर्मात्याने आपल्यासाठी कशी, कोणती, शिंगे आणि कातडी तयार ठेवली आहेत हे पहाण्याची विलक्षण उत्सुकता सगळ्यांनाच वाटली.

ह्या सगळ्यातून एकटा झेब्रा मात्र बाजूला राहिला. खाणे ही एकच गोष्ट त्याच्या दृष्टीने महत्त्वाची होती. झेब्रा आधाशी प्राणी आहे हे जगजाहीर होतं. दुसऱ्या दिवशी भल्या पहाटेच सगळी जनावरे सरोवराकाठच्या त्या गुहेकडे चालू लागली. झेब्रा मात्र गेला नाही. तो म्हणाला, "सरोवर फारच दूर आहे. केवढी तरी वाटचाल करावी लागेल. निघण्याआधी चांगलं खाऊन घेतलेच पाहिजे. लुसलुशीत चविष्ट गवताची न्याहारी न करता शिंग आणि कातड्यांच्या मागं सगळे का धावत सुटलेत कुणाला ठाऊक!"

घाईने जाताना वरचेवर इतर जनावरांनी जिराफाला हाका दिल्या. "ए, पळ. गुहेकडं बोलावलय् सगळ्यांना." झेब्रा तोंडातल्या तोंडात बोलला, "व्हा पुढं. मी येईन माझी न्याहारी आटोपल्यावर!" आणि

गवताचा मोठ्ठा घास घेऊन त्याने तोंड बंद केले. जाणारी जनावरं म्हणाली, "ह्या झेब्र्याशी बोलण्यात अर्थ नाही. त्याला दुसऱ्या कुणाची किंमत नाही."

इतरांशी वागण्यातली रीत न पाळणाऱ्या झेब्र्याला तिथंच सोडून जनावरं पुढे गेली.

बऱ्याच वेळानं झेब्रा म्हणाला, "बास आता. भरपेट न्याहारी झाली." आणि रमतगमत तो बाकी जनावरांनी रूंद वाट पाडलेली होती ती धरून सरोवराकडं गेला. सरोवराजवळ आल्यावर झेब्र्याला परत फिरलेली जनावरं दिसली. त्यांच्या बदललेल्या रूपाकडं बघून झेब्रा चकीत झाला. हत्तीनं काळसर राखी रंगाचा कोट पसंत केलेला होता. पण तोंडातून बाहेर आलेल्या सुरेख अशी दोन सुळ्यांनी त्या कसनुशा कोटाला शोभा दिली होता. सिंहानं उदी, पिवळसर रंगाचा कोट आणि मानेला काळसर लांब, राजेशाही



आयाळ निवडली होती. सेबल काळविटानं काळा चकचकीत कोट आणि पाठीमागं वळलेली शिंगं घेतली होती.

नवं रूपं घेतलेली, एका पाठोपाठ एक जनावरं त्याने मागं टाकली. शेवटी गुहेच्या तोंडाशी पोहोचताना झेब्र्याला गेंडा दिसला. अधू डोळ्यांच्या गेंड्याने फार ढगळ कोट घेतला होता. लहान पोरानं बापाचा अंगरखा घातल्यावर जसा दिसेल तसा त्याचा कोट ढगळ दिसत होता. गेंड्यानं शिंगं घेतानाही ती सारख्या आकाराची घेतली नव्हती. शिवाय ती डोक्याऐवजी नाकावर खोचली होती. तात्पर्य, गेंडा अगदी ध्यान दिसत होता. पण स्वतः मात्र फार खूष होता.

झेब्रा गुहेत गेला तेव्हा एकच कोट शिल्लक होता. त्याच्यावर ठळक काळेपांढरे पट्टे होते. झेब्र्यानं गुहेत सगळीकड शोधलं, पण शिंगं दिसली नाहीत. बरीच वाट चालून आल्यावर झेब्रा भुकेलेला होताच. त्यानं होता तो पट्टेरी कोट घालून पाहिला तर तो अगदी झकास त्याच्या अंगाला आला. फार भूक लागल्यामुळं आपल्या अंगावर हा इतरांपेक्षा निराळा दिसतोय ह्याचा विचार झेब्र्यानं केला नाही. आपल्यासाठी शिंगं उरली नाहीत ह्याचं वाईट वाटून घेतलं नाही.

इकडं सगळी जनावरं कुरणातल्या गवतावर चरत चरत एकमेकाच्या नव्या रूपाची तारीफ करीत होती. झेब्रा कुरणात पोचला आणि कुणाशी काही वटवट न करता खाली मान करून चरायला लागला. हे त्याचं दुपारचं जेवण होतं.

झेब्र्याच्या अंगावरच्या पट्टेरी कोटानं सगळ्यांचं लक्ष वेधून घेतलं. जनावरांनी आरडाओरडा करून, टर उडवून झेब्र्याचं स्वागत केलं.

काळवीट ओरडलं, "बघा रे ह्या आधाशी झेब्र्याला. ह्याच्या अंगावरचा डगला बघा. शिंगाशिवाय भुंडं ह्याचं डोकं बघा."

काळविटामागोमाग बाकी जनावरांनीही एकच गिल्ला केला.

झेब्र्याला पर्वा नव्हती. खायला भरपूर हिरवं लुसलुशीत गवत असलं म्हणजे झालं. करायचं काय आहे शिंगांना?

आजपर्यंत कधीही झेब्र्याला शिंगांची गरज नाही लागली. बघाल तेव्हा तो गोलगरगरीत दिसतो आणि त्याचं काळं पाढरं अंगही तजेलदार, चकचकीत असतं.

# झेब्रा पट्टेरी कसा झाला

(झुलू लोकांमधील कथा)

कोणे एके काळी एक भला दांडगा मोठा भयानक बॅबून माकड झाडांवरून खाली उतरला आणि डंकोलोजी ह्या महानदीच्या काठी राहू लागला. नदीकाठी त्यानं घर केलं आणि सर्व प्राण्यांत

जाहीर केलं की, "आजपासून हे रान माझ्या मालकीचं आहे. ह्या नदीचं पाणी वापरण्याची कुणालाही परवानगी नाही. मी एकटा हिचे पाणी पिईन."

सगळ्या जनावरातला एक बहाद्दर ह्या माकडाच्या विरूद्ध उठला. तो होता अभिमानी तरूण नर झेब्रा, 'डुबे'. कहाणीतल्या एकशिंगी युनिकॉर्नप्रमाणे त्या काळी झेब्रे पांढरे शुभ्र होते. डुबे मोठा शूर झेब्रा होता. त्यानं बॅबूनला युद्धासाठी आव्हान दिलं. बॅबून हा पराक्रमी योध्दा होता. अनेक लढायांचा त्याच्यापाशी अनुभव होता. त्यानं लढण्यासाठी होकार दिला. लढाईतले डावपेंच त्याला चांगले माहीत होते.

तो म्हणाला, "लढाई हरणाऱ्याला नदीपलीकडच्या उजाड टेकाडावर हद्दपार होऊन कायमचं रहावं लागेल. कबूल? ठीक, मग ये उद्या माझ्या आळीला!"

दोघांची लढाई अगदी घनचक्कर झाली. दोघही आवेशानं लढले. निसर्गानं दिलेली शस्त्रे दोघांनीही वापरली. झेब्र्याने आपल्या धारदार टापा आणि दात वापरले. बॅबून माकडाने आपले सुळे आणि चपळाई वापरली. माकडाची सरशी झाली, आणि झेब्रा पार विस्तवानं धगधगणाऱ्या, आळीतल्या आगटीत रेटला गेला. आगटीच्या निष्ठूर झळांनी झेब्र्याचं अंग चाटून पोळून टाकलं. त्या वेदनांनी डुबेला नवं बळ दिलं आणि लाथेच्या जोरदार तडाख्यात त्यानं बॅबूनला हवेत उडवलं. नदीच्या पलीकडं, टेकाडावरच्या दगडी शिळात जाऊन बॅबून दाणकन् आदळला. एवढ्या जोरानं आदळला की त्याच्या बुडाचे केस तासले जाऊन त्या जागी टक्कल पडलं. ते आजसुद्धा तसंच राहिलेलं आहे.

डुबेच्या अंगावर आगटीच्या झळांनी काळे काळे पट्टे उठले. पण अखेर तोच लढाईत जिंकला. नदीचं पाणी सगळ्या जनावरांना मिळालं.

त्या दिवसापासून झेब्रे आपल्या अंगावरचे काळे पट्टे अभिमानानं मिरवतात. बॅबून माकड दगडी टेकाडावर डांबून रहातात आणि झेब्रे पाहिजे तेव्हा नदीला पाण्यावर जातात.

---

**झेब्र्याविषयी माहिती**

**जात :**

**बर्चेल्स झेब्रा *(Equus burchelli)***

चाळीसपर्यंत झेब्रे कळपाने रहातात.

| | **नर** | **मादी** |
|---|---|---|
| उंची | 4 फूट | 4 फूट |
| वजन | 320 किलो | 280 किलो |
| जन्मल्यानंतरचे वजन | 30 किलो | 30 किलो |
| आईला पिणे | 11 महिने | 11 महिने |
| वयात येणे | 3 वर्षे | 3 वर्षे |
| गाभण काळ | — | 1 वर्ष |
| पिल्लांची संख्या | — | 1 |
| आयुष्य | 20 वर्षे | 20 वर्षे |



**ओळख :** झेब्रा हा घोड्यासारखा, किंवा काळ्या पांढऱ्या पट्ट्यांची कातडी अंगावर असलेल्या घोड्यासारखाच आहे. तो आफ्रिकेचा रानघोडा आहे. सगळे झेब्रे दुरवरून दिसायला सारखेच असले तरी प्रत्येकाच्या अंगावरची पट्टेरी नक्षी वेगळी असते.

**जन्मस्थान :** तुरळक झाडी असलेले पाण्याशेजारचे गवताळ कुरण.

**सवयी :** चाळीसपर्यंत संख्या असलेल्या आपल्या जातीच्या कळपात आपल्या लहान कळपासह मिसळावे आणि दौडावे हे झेब्र्याला पसंत असते.

नर झेब्रा स्वत:भोवती माद्यांचा मेळा जमवतो आणि इतर नरांना माद्यांकडे फिरकू देत नाही. दोन नरांचे भांडण हे दूरवर ऐकू जाते. भांडणात ते भयंकर आवाज करतात, भुंकतात. जोरजोराने किंकाळतात, जीवघेण्या लाथा मारतात, चावतात. कधीमधी झेब्रे निळसर रंगाच्या वील्डबीस्टच्या (Wildebeest) कळपात मिसळून प्रवास करतात. वील्डबीस्ट खातात ते गवत आणि झेब्रे खातात ते गवत हे वेगवेगळ्या जातीचे असते. त्यामुळे भांडणतंटा होत नाही. दोघांनाही पुष्कळ पाणी हवे असते. ते मिळवण्यासाठी लांबवरचा प्रवास ह्या दोन्ही जाती करतात.

झेब्रा ही सिंहाची आवडती शिकार आहे. मागच्या दोन्ही पायांनी लाथा हाणून खुरांनी सिंहाला जखमी करणे एवढेच स्वसंरक्षणाचे साधन झेब्र्यांपाशी असते. झेब्र्यांच्या लाथेने जबड्याचे हाड मोडल्यामुळे कित्येक सिंह उपासमारीने मरतात.

झेब्रा हा घोडा, गाढव यांचा भाऊबंद आहे. त्याच्या खुरांचे ठसे आणि लीद ही घोडा गाढवांसारखीच असते.

झेब्र्याच्या अंगावरचे काळे पांढरे पट्टे त्याला दडून राहण्यासाठी मदत करतात. का ठळक पट्टे उठून दिसायला? असा प्रश्न तुम्हाला पडेल. पण मोकळ्या माळावर, उन्हाच्या झळा उठल्यावर झेब्र्याच्या अंगावरचे काळे पांढरे पट्टे अस्पष्ट होतात, पुसले जातात. मग काही मैल अंतरावर असलेला झेब्र्यांचा कळप दिसेनासा होतो. झेब्र्यांचा कळप धावत असला तर शिकारी पशू गोंधळून जावा असाही उद्देश असावा. काळ्या पांढऱ्या रेषांच्या गुंतवळीतून पाहिजे तो विशिष्ट झेब्रा कसा शोधता येईल?

अंगाने वाळलेला झेब्रा तुम्हाला कधीही दिसणार नाही. कारण त्याच्या कातड्याखालीच तेवढी चरबी नसते, ती खोल अंगभर असते. झेब्र्याची उपासमार होत आहे, हे त्याची मानेवरची आयाळ एकाच बाजूला पडायला लागल्यावर कळते. कारण फक्त पृष्ठभागाखाली लगेच चरबी असते ती केवळ मानेच्या लांबीवर.

कळपापैकी एका दोघांशी झेब्रा घनिष्ठ मैत्री ठेवतो. हे मित्र सदैव एकत्र असतात.

**अन्न :** झेब्रा हा गवत खाऊन रहाणारा आहे. पण जेव्हा गवत दुर्मिळ होत जाते तेव्हा आपल्या पुढच्या खुरांनी जमीन उकरून आतली मुळे काढून तो ती खातो.

**वेत :** याचा काही विशिष्ट असा काळ नाही. एका वेळी एकच शिंगरू जन्माला येते. जन्मल्यानंतर काही तासांतच ते कळपातील इतरांबरोबर मिळून मिसळून वागू लागते. हे एक मोठे आश्चर्य म्हटले पाहिजे.



# त्सेसिबी काळविटाला अजब शिंगे कशी मिळाली

(बुशमन लोकांमधील कथा)

सुरुवातीला सृष्टीनिर्माता श्रेष्ठ मान्टिसच्या मदतीने जंगलातल्या प्राण्यांच्या जाती घडवायला लागला तेव्हा त्याच्यापुढं ते एक अवाढव्य काम ठरलं. ह्या कामाचा शेवट जवळ आला तेव्हा सृष्टीनिर्माता फार फार दमून गेला होता. कसंतरी त्यानं काम संपवलं आणि ह्या गडबडीत त्सेसिबी काळविटाला शिंगे द्यायला तो विसरला.

इतर काळविटांनी बापड्या त्सेसिबीची चेष्टा केली, त्याची टर उडवली. त्यांच्या सगळ्यांच्या डोक्यावर नाना तऱ्हांची शिंगे शोभत होती. वेगवेगळ्या आकारातली, वेगवेगळ्या घडणीची, दिसायला सुंदर, डौलदार, आणि उपयोगी.

त्सेसिबीला फार वाईट वाटलं. आपल्यालाच तेवढं का वगळलं? हा प्रश्न उगाळत तो एकटाच भटक भटकला. शिंगवाल्या कोणा हरणाजवळ गेलाच नाही. ते आपल्याकडं बघून हसतील असं त्याला वाटलं. अखेरीला हिम्मत करून त्यानं सृष्टीनिर्मात्यापुढं जायचं ठरवलं.

मोठं काम पार पाडून झाल्यावरचा विसावा तो घेत होता. अशा वेळी येऊन कोणी त्रास द्यावा हे त्याला बरं वाटलं नाही. त्सेसिबीचा अर्ज त्यानं ऐकून घेतला. अशी चूक कोणी दाखवून द्यावी ह्याचा त्याला राग आला.

आपलं बोलणं संपल्यावर मान खाली घालून बापडा त्सेसिबी गप्प उभा राहिला. सृष्टीनिर्मात्यानं उरलेसुरले मूठभर वळवलेले ताकडेतुकडे गोळा केले आणि त्या हरणाच्या डोस्क्यावर रोवले.

तो म्हणाला, "झालं का आता? जा बघू, सूट."



बाकी जनावरांनी त्सेसिबीची शिंगं बघितली तेव्हा त्याची जास्तीच चेष्टा केली. खरं म्हणजे तो कसातरीच दिसत होता. शिंगांमुळे तो आणखी वरमला.

स्वभावानं भित्रा, हळूबाई असलेला हा जीव पुन्हा सृष्टीनिर्मात्यापाशी जाण्याच धाडसं करणं शक्यच नव्हतं. उदास मनानं त्यानं ठरवलं की, जे मिळालं आहे त्यात सुख मानून रहावं हे बरं. अगदी भुंडं हिंडण्यापेक्षा कसलीतरी शिंगं मिळालीत हे काय कमी आहे?

त्सेसिबीची शिंगे बघून इतर शिंगेवाल्यांनी केलेला तमाशा सृष्टीनिर्मात्याच्याही कानावर पडला होता. कणव वाटून त्यानं त्सेसिबीला पारितोषिक बहाल केलं. त्सेसिबीला वेग आणि चपळपणा ह्या दोहोंचं वरदान दिलं.

मग मात्र सगळी काळविटे त्सेसिबीचा फार हेवा करायला लागली.

आता त्सेसिबी वाऱ्यासारखा पळतो आणि आपल्या शिंगांच्या व्यंगाकडे त्यानं संपूर्ण दुर्लक्ष केलेलं आहे.

## त्सेसिबीविषयी माहिती

**जात :**

**त्सेसिबी किंवा ससाबी *(Damaliscus lunatus)***

वीसपर्यंत संख्या असलेल्या कळपाने रहातात.

***नाहीशी होत असलेली जात.***

| | नर | मादी |
|---|---|---|
| उंची | 4 फूट | 4 फूट |
| वजन | 160 किलो | 145 किलो |
| जन्मल्यानंतरचे वजन | 10 किलो | 10 किलो |
| आईला पिणे | 6 महिने | 6 महिने |
| वयात येणे | 4 वर्षे | 3 वर्षे |
| गाभण काळ | — | 8 महिने |
| पिल्लांची संख्या | — | 1 |
| आयुष्य | 12 वर्षे | 12 वर्षे |




**ओळख :** त्सेसिबी हे मोठ्या काळविटांपैकी लांब तोंडाचे, उतरत्या पाठीचे आणि वशिंडी खांद्याचे काळवीट आहे. ह्यांची शिंगे शुक्लपक्षातील चंद्राच्या आकाराची, स्पष्ट कड्यांनी वेढलेली असतात. रंग जांभळट विटकरी असतो. डोळ्यांखाली उघडे चट्टे, मांड्यांवर, खांद्यावर राखाडी रंगाचे डाग असतात. शिंगे नराला असतात तशी मादीलाही असतात.

**जन्मस्थान :** गवताळ कुरणे, पुरांमुळे सपाट रानात झालेली दलदल.

**सवयी :** दक्षिण आफ्रिकेतले त्सेसिबी हे सर्वांत जास्त वेगवान काळवीट आहे. अत्यंत चपळ अशा हिंस्त्र पशूंच्याही तावडीतून ते पळून जाऊ शकते. त्याचा वेग ताशी साठ किलोमीटर (ताशी सदतीस मैल) असतो. म्हणजे रेसचा घोडा जेवढ्या वेगाने पळतो तेवढ्या वेगाने हे काळवीट पळते. रानगुरे, झेब्रे यांच्या आसपास त्सेसिबी आढळतात. चरण्यासाठी ह्यांनाही मोकळे रान पसंतीचे असते. वील्डबीस्टप्रमाणे हेही कळपाने रहातात. त्सेसिबींना पुतळ्यासारखे वारूळावर उभे रहाण्याची खोड असते. बराच वेळ ते असे न हलता उभे रहातात. हे क्षेत्र माझ्या मालकीचे आहे असे त्यांना इतर त्सेसिबींना जाहीर करायचे असते. आपली शिकार साधणारा कोणी पशू आसमंतात असला तर त्यालाही हेरावा हाही त्याचा उद्देश असावा.

**अन्न :** गवत हेच त्यांचे खाद्य आहे.

**वेत :** सप्टेंबर, ऑक्टोबरमध्ये एक पाडस जन्माला येते.



# चामखिळ्या डुकराने कुणापुढे गुडघे टेकले

(झुलू लोकांमधील कथा)

मुंगीखाऊ खवल्या मांजराच्या जुन्या बिळात चामखिळ्या डुकरानं आपलं घर केलं होतं. बिळाचं तोंड वाढवून जायला यायला रूंद दार ठेवलं होतं. आवारातल्या सगळ्या बिळांपेक्षा आपलं हे बीळ थोर आहे असं त्याला वाटे. पण, एके दिवशी डुकरानं सहज घराच्या दाराशी येऊन समोर बघितलं आणि त्याला भीतीनं घाम सुटला. दबत दबत सिंह ह्याच बिळाकडं येत होता!

तात्काळ डुकरानं नाटक रचलं. बिळाच्या छपराला पाठीचा रेटा देऊन, सुळ्यानं टेकण दिलं व तो सिंहाला म्हणाला, "मेलो! मेलो! हे छप्पर कोसळतंय. महाराज तुम्ही पळा."

ह्याच पद्धतीनं कोल्ह्यानं फसवल्याचं सिंहाला चांगलं आठवणीत होतं. आता तो पुन्हा फसणार नव्हता. रागानं त्यानं मोठी गर्जना केली. त्यासरशी डुक्कर भिऊन गुढग्यावर आला. थरथर कापत त्यानं सिंहापुढं याचना केली, "महाराज, दया करा, दया करा,"

सुदैवानं सिंह भुकलेला नव्हता आणि ह्या चामखिळ्या डुकराला, कोल्ह्यानं एकवार केलेली युक्ती पुन्हा गिरवावी वाटली याची त्याला गंमतही वाटली होती. "मूर्खा, गुढग्यावरच रहा आता," असं म्हणून त्यानं डुकराला सोडून दिलं. आपण निघून गेला. त्यामुळं आजही तुम्हाला दिसतं की चामखिळ्या डुक्कर पुढच्या गुढग्यावर बसून चरतो. ह्या स्वाभिमानशून्य स्थितीत त्याचं बूड हवेत वर असतं आणि मुस्कटानं तो माती हुंगत असतो.

# चामखिळ्या डुक्कर इतका कुरूप का

( पूर्व आफ्रिकेतील एक कथा )

सुरवातीला चामखिळ्या रानडुक्कर हा लहानसा आणि दिसायला गोजिरवाणा प्राणी होता. पण त्याच्या स्वभावातला तोरा आणि वागण्यातला उद्धटपणा ह्याच्यामुळं कुरणातील इतर जनावरं त्याचा तिरस्कार करायची. सशासारखा प्राणीसुद्धा रानडुकराचा अरेरावीपणा खपवून घ्यायचा नाही.

जमीन खोदून स्वतःसाठी आरामशीर घर करण्यात रानडुक्कर फार तरबेज होता. मुंगीखाऊ खवल्या मांजरानं रहायचं सोडून दिलेली ही बिळं असत. काही डागडुजी, काही लांबी रूंदीत फरक करून त्याचं आरामशीर रहातं घर रानडुक्कर स्वतःसाठी तयार करी.

सावजाचा माग काढत रात्रीच्या अंधारात हिंडणाऱ्या हिंस्त्र पशूंपासून रानडुक्कर ह्या बिळात सुखरूप राही. आणि दिवसासुद्धा दडण्याची ही जागा सोडून ते आजूबाजूला दूर असं कधी जातच नसे. उद्धट स्वभावामुळं जेव्हा तेव्हा त्याला बिळात घुसून स्वतःचा बचाव करावा लागे.

एके दिवशी भल्या सकाळी रानडुक्कर आनंदानं मुळे, गवताचे कोंब खाण्यात रंगलं होतं. बूड वर आभाळाकडं करून, आब टाकून दिल्यासारखं हे त्याचं वागणं होय. खाण्याच्या नादात जवळपास साळींदर आलं आहे हे त्याला कळलं नाही.



साळींदर रात्रभर खाणं शोधत हिंडून दमलेलं होतं. रानडुक्कराच्या बिळाचं तोंड बघताच ते भसकन आत शिरलं. खाली ऐसपैस जागा बघून त्यानं अंगाचं वेटोळं केलं आणि डोळे मिटून ते झोपून गेलं.

बराच वेळ चरून झाल्यावर रानडुक्कर जवळच्या पाण्याकडे गेलं. तिथल्या राडीत मनसोक्त लोळलं. तरतरी आल्यावर पुन्हा चरायला जाणार एवढ्यात त्याला सिंह दिसला. शत्रू दृष्टीला पडताच रानडुक्कराला रहावलं नाही. "काय झिंज्या बटा झाल्यात आयाळीच्या. अहाहा, काय ध्यान दिसतयं," असं काही नावं ठेवणारं बोललाच. ते सिंहाला फारच लागले. कुणीही उठावं आणि काहीही बोलावं म्हणजे काय? हे भिक्कारडं डुक्कर पायरी विसरून मला नावं ठेवतयं आणि तेही तोंडावर! सिंह तात्काळ रानडुकराच्या अंगावर धावला. आता ह्याला धरतो आणि चांगला धडा शिकवतो!

सिंह अंगावर धावलेला बघून रानडुकराची भीतीनं धांदल उडाली. ते आपल्या बिळाकडं पळायला लागलं. डुक्कर पुढं आणि सिंह मागं अशी जोरदार पळापळी झाली. अखेर डुकरानं बीळ गाठलं. ते आत शिरलं. तोंडाशी पहारा देत उभे रहाण्याची सिंहावर पाळी आली.

इकडं बिळातं झोपलेली साळींदर उर्फ सायाळ जागी झाली. तिला वाटलं आपला घास घ्यायला कोणी शत्रू आला. चट्‌दिशी चारी पायावर उभी राहून हल्ला चढवायला ती तयार झाली. आणि सिंहाला भ्यालेलं डुक्कर घुसून थेट तिच्यावर आदळलं. त्याच्या तोंडाला तिनं फिस्कारलेले अणकुचीदार काटे कचाकच घुसले.

डुकराच्या बिळातून किंचाळ्या, वेदनाचं ओरडणं ऐकून सिंह बावरला. एवढ्यात चामखिळ्या डुक्कर बिळातनं बाहेर आला. ह्याच्या गालांना, कपाळाला, नाकाला बारा पंधरा सायाळकाटे भोसकलेले होते.

सिंहानं डुकराचं ओरडणं ऐकलंच होतं. आता त्याच्या तोंडाला लागलेले काटे पाहिले. "ह्याला चांगलाच धडा मिळाला," असं म्हणून सिंहाने वेदनेनं तळमळणाऱ्या रानडुकराला वाईट बोलण्याचे फळ भोगायला सोडलं आणि तो निघून गेला.

डुकराची दशा दशा झाली. हा लेकाचा सतत तोऱ्यात असतो आणि उद्धटासारखं बोलतो म्हणून कोणीही त्याच्या तोंडावरचे सायाळीचे काटे उपसून काढायला पुढे आले नाही. रानडुकराचा चेहेरा भप्प सुजला आणि बराच काळ ठणकत राहिला.

आज बघितलं तर ह्या रानडुकराच्या तोंडावर चामखीळ आणि टेंगळं दिसतात. त्याचा गोंडसपणा आता राहिलेला नाही. धडा मिळाल्यामुळं तो आता सर्वांना नमून असतो. आपण बरं आणि आपलं घर बरं असा रहातो.

आणि तोंड संभाळण्यासाठी चामखिळ्या डुक्कर आता शेपटाकडून बिळात शिरतो.

**चामखिळ्या डुकराविषयी माहिती**

**जात :**

**वॉर्ट हॉग** ***(Phacochorus aethiopicus)***

जोडीने किंवा कुटुंबाच्या छोट्या कळपात असतात.



| | **नर** | **मादी** |
|---|---|---|
| उंची | 2 फूट 5 इंच | 2 फूट 4 इंच |
| वजन | 70 किलो | 60 किलो |
| जन्मल्यानंतरचे वजन | 800 ग्रॅम | 800 ग्रॅम |
| आईला पिणे | 3 महिने | 3 महिने |
| वयात येणे | 2 वर्षे | 1 वर्ष 2 महिने |
| गाभण काळ | — | 4½ महिने |
| पिल्लांची संख्या | — | 3-7 |
| आयुष्य | 12 वर्षे | 12 वर्षे |

**ओळख :** वरच्या बाजूला वळलेले सुळे, तोंडावर असलेले मोठे, कुरूप चामखीळ आणि राखी रंगाचे अंग असा चामखिळ्या डुक्कर ओळखण्यात चूक होणार नाहीच. गालफडे आणि खांदे ह्या जागेचे राठ केस वगळले तर ह्याच्या अंगावर केस नसतात. आयाळीचा रंग काळसर असून आयाळ उभे असते. शेपटीचे टोक पिंजारलेल्या राठ केसांचे असते. नर आणि मादी अशा दोघांनाही सुळे असतात.

**जन्मस्थान :** गवती कुरणातच पाण्यापाशी रहातात.

**सवयी :** आई, बाप आणि पिल्लू असे कुटुंबच आढळते. कारण ह्यांना दिवसा, सूर्य डोक्यावर आला असताना पाण्यावर जावे लागते.

मुंगीखाऊ मांजराने सोडलेल्या बिळांचा हे रहाण्यासाठी उपयोग करतात. बिळात शिरताना शेपटीच्या बाजूने शिरतात. भ्याले, घाबरले म्हणजे हे डुक्कर, रडार ॲन्टेनाप्रमाणे दिसणारी आपली शेपटी उभी करतात. हे दृश्य गंमतीचे वाटते. मागील बाजूने बिळात शिरण्यामुळे त्यांचे सुळे बिळाबाहेर-रहातात. आणि त्यांची शिकार करू इच्छिणाऱ्या हिंस्त्र पशूशी ते सामना देऊ शकतात.

सिंह, बिबटे, चित्ता, तरस, रानकुत्री असे जबरदस्त शिकारी चामखिळ्या डुकरामागे असतात. त्यांचे ते आवडते खाद्य आहे.

गावडुकरासारखी चामखिळ्या डुकराचीही दृष्टी मंद असते. पण नाक आणि कान कमालीचे तीक्ष्ण असतात. ही दिसायला भयाण दिसतात पण असायला सौम्यच असतात. कोणी चेपू म्हणून अंगावर आले तरच ही खवीस होतात, एरवी नाही.

**अन्न :** चरणे आणि जमिनीमधली मुळे उकरून खाणे हे ह्यांचे प्रमुख खाद्य आहे. असे चरताना पुढच्या दोन्ही पायांचे गुडघे ते जमिनीवर टेकतात.

**वेत :** सामान्यपणे चामखिळ्या डुकरिणीला चार पिल्ले होतात. कित्येकदा ही संख्या आठही असते.





# बनवाबनवीतील शर्यत

(स्वाझीलॅन्डमधील एक कथा)

एके दिवशी कासव एकटंच शांतपणे चरत असताना मोफुली ससा तिथं टपकला. संधी मिळताच कासवाची टिंगल-टवाळी करण्याची ह्याची खोड होती. कासव कसं जडशीळ आणि चालण्यात हळूबाई असतं ह्याची नक्कल वठवून तो कासवाची टर उडवी.

खोडील सश्यानं कासवाशी पळण्याची शर्यत लावली. पाचशे मीटर अंतरावर काही ताडाची झाडं होती. मोफुली म्हणाला, "तिथ पोहचायचं दोघांनी."

कासवाला मोफुलीसकट सगळ्या ससा जातीचाच वैताग आलेला होता. टवाळी ऐकून घेण्याची कासवाची ही काही पहिलीच वेळ नव्हती. ह्याची पक्की जिरवली पाहिजे, इतकी जिरवली पाहिजे की पुन्हा ह्यांच्यापैकी कोणी आपल्याकडं डोळा वर करून बघणार नाही.

थोडा वेळ विचार करून कासव बोललं, "मोफुली, वेग हा काही सर्वस्व नाही. शर्यतीत सहनशक्तीही मोजावी लागते. आपण खरीखुरी शर्यत लावूया. भरपूर अंतर ठेवूया. दहा किलोमीटरची शर्यत. पाच दिवसांनी दुपारची शर्यत ठेवू. मला तयारीसाठी वेळ मिळेल."

ससा चकीतच झाला. शर्यत ही गोष्ट कासव मानणार नाहीच आणि आपल्याला बराच काळ टिंगल करायला मिळेल, अशी त्याची अगदी खात्री होती. कासवानं आव्हान स्वीकारलं तरी ससा त्या आव्हानाकडं तुच्छतेनंच बघत होता. शर्यत टाळण्याकडंच त्याचा कल होता. पण कासवाला फार खुमखुमी होती. त्यामुळं सशाला शर्यतीला कबूल व्हावं लागलं. ससा हसत हसत आपल्या वाटेला लागला. कासवाचा मूर्खपणा त्याला सांगायचा होता.

कासवानं ताबडतोप आपल्या जातभाईंना निरोप धाडून बोलावून घेतले. मला मदत करा अशी विनंती त्यांना केली. आपली योजना सविस्तर सांगितली. ती पार पाडणं अगदी सोपं आहे हेही सांगितलं.

शर्यतीच्या मार्गावर शनिवारी दुपारी त्या सर्वांनी वेगवेगळ्या जागा धरून तयारीत रहायचं. त्या सर्वांनाच 'ब्लू पॅन' ह्या जागेकडं जायचं आहे हे ध्यानात घ्यायचं. आपली वेळ आली की भरभर ब्लू पॅनकडं

निघायचं. असं जाताना त्यांना ससा ओळखून जाईलच. तो गेला की ह्यांची सुट्टी. त्यांनी खुशाल घरी जाऊन विश्रांती घ्यायची.

त्यानंतर कासवानं वाळलेला रानभोपळा घेतला. त्यात पिण्यासाठी पाणी भरलं आणि त्याच दिवशी पॅनकडे प्रवास चालू केला. ब्लू पॅनला पोहोचेपर्यंत त्याला पाच दिवस लागले. शेवटी कासव मुक्कामावर पोचले. शनिवारी दुपारी भोपळा पुन्हा पाण्यानं भरून कासव वाट पहात थांबले.

इकडे, मोफुली ससा ठरल्या वेळी शर्यतीच्या जागी येऊन पोचला. तिथं त्याला कासवाचं चुलत भावंडं दिसलं. पण सशाला काही फरक जाणवला नाही. त्याला वाटलं शर्यतवालं कासव हेच. दोघांनी एकमेकांना सलामी दिली आणि शर्यत सुरू झाली.

डोळ्यांची पापणी लवते न लवते तोवर उडालेला ससा दिसेनासाही झाला.

कासवाचं चुलत भावंडं देह ढकलत वाटचाल करीत होतं. आपल्याशी हसत होतं. मोफुली ससाही हासत होता. पहिलं टेकाड आलं. ससा टेकडीवर पोहोचला आणि समोर बघतो तर कासव त्याच्या पुढं होतं! (खरं तर शर्यतवाल्या कासवाचा हा भाऊ होता.) ससा जोरात पळाला. पुढे ससा गोंधळून गेला. शर्यत जसजशी पुढे जात होती तसा ससा जास्ती गोंधळत गेला.

प्रत्येक उमाठ्यावर सशाला कासव पुढं गेलेलं दिसे. ससा धावत जाऊन त्याला मागं टाके आणि मोठमोठ्यानं हसे. पण पुढं त्याला वाटायला लागलं की कासव आभाळातून उडत जायला शिकलं तर नाही ना? सूर्य डोक्यावर आला. उन्हं तळपू लागली. अजून ब्लू पॅन तीन किलोमीटर अंतरावर होतं. सशाला फारच तहान लागली. पुढच्या उमाठ्यावर तो पोहोचला. आणि पहातो तर कासव पुढं आहेच.

सगळं बळ पणाला लावून ससा पळाला. त्याचे काळीज धडधडत होतं. सगळे स्नायू ताणले गेले होते.

शेवटी आले एकादाचे ब्लू पॅन. ससा अगदी टेकायला आला तिथं. पण तेवढ्यात धडपडला, थकला



आणि पडला. धापा टाकत जमिनीवर पडून राहिला. त्याच्या दोन्ही कुसा वर खाली होत होत्या. आणि चारी पाय थरथरत होते.

काही वेळानं तो धडपडून उठला. कसाबसा उभा राहिला. त्यानं समोर पाहिलं. काय दिसलं असेल त्याला? ब्लू पॅनपाशी त्याच्या आधी कासव पोचलं तर होतंच पण आता ते सशाच्या दिशेनं परत येत होतं. त्याच्याजवळ थंडगार आणि निव्वळशंख पाण्यानं भरलेला रानभोपळा होता.

हे मात्र अतिच होतं. सशाला जबरदस्त धक्का बसला. त्याला घेरी आली. बेशुद्ध होऊन तो खाली कोसळला.

कासवानं सशाला त्याच्या तोंडावर गार पाणी शिंपडून सावध केलं. कासव बोललं, "मित्रा, पाणी पी. मला माहितच होतं, तुला पाणी लागेल. काही जणांना वाटतं की आपल्यापाशी अगदी उदंड सहनशक्ती आहे पण ते खरं नसतं."

अशा रीतीनं म्हाताऱ्या आणि मंद कासवानं सशाचा डाव त्याच्यावरच उलटवला.

मोफुली ससा हुषार होता. पण आपणच आपलं हसं करून घेतलं ही गोष्ट त्याला कळली नाही.

# रस्सीखेच

(न्डबीलि जमातीमधील कथा)

उमव्हंडला नावाचा झाम्बेझी नदीकाठी रहाणारा ससा सकाळीच फार कंटाळला. जीव रमवण्याजोगी काही गंमत केली पाहिजे असं त्याला वाटले. काय बरं करावं म्हणून इकडे तिकडे बघत असताना, त्या परिसरात रहाणारे दोन प्रतिष्ठित जीव त्याला दिसले. एक गेंडा आणि दुसरा पाणघोडा.

आपण काही देखण्यांत जमा नाही याची जाणीव पाणघोड्याला होती. पण आपण शक्तीमान आहोत याचा त्याला अभिमानही होता. उमव्हंडला ससा उड्या घेत नदीतीराशी गेला आणि ओरडून बोलला, "अरे पाणदांडग्या, तू का रे म्हणतोस मी शक्तीने मोठा आहे? माझ्यासारखा अंगानं बारका, चारी पायाने काटकुळा ससासुद्धा रस्सीखेच शर्यतीत तुला हरवील."

सशाचं तोंड बंद व्हावं, डोक्याला होणारी कटकट थांबावी म्हणून पाणघोडा म्हणाला, "रस्सीखेच? ठीक आहे. लांबकान्या, बघच तू माझी ताकद."

उमव्हण्डला आनंदानं नाचला. नदीपलीकडे असलेले मोठं वारूळ दाखवून तो पाणघोड्याला म्हणाला, "मी तुला नदीपलीकडेच काय पण त्या वारूळापलीकडे खेचून नेईन." मग लांबलचक, मजबूत दोर वळण्यासाठी ससा नाहीसा झाला. काही वेळानं परत येऊन त्यानं आणलेला दोर पाणघोड्याच्या मागच्या



पायाला बांधला व म्हणाला, "आता मी टेकडीआडून ओरडीन 'हां ओढ' तेव्हा तू सगळी शक्ती एकवटून ओढायचंस. आज मी तुला भारी होणारच बघ."

काही न बोलता पाणघोडा उथळ पाण्यात डुंबत राहिला. पाणी उन्हानं कोमट झालेलं होतं. डुंबता डुंबता त्याला झोप लागली.

सश्यानं दोराचं दुसरं टोक घेतलं आणि तो टेकडीला वेढा घालून पलीकडच्या बाजूला गेला. तिथं नर गेंडा सावलीत झोपला आहे हे सशाला माहीत होतं. मुंग्याच्या बिळातल्या काही चावऱ्या तांबड्या मुंग्या घेऊन सशानं त्या हळूच गेंड्याच्या कानात सोडल्या. त्यासरशी डुरकी मारून गेंडा जागा झाला. पायानं कान खाजवत त्यानं जोरानं डोकं झिंजाडलं.

"गुड मॉर्निंग," ससा बोलला. मुंग्याचं घर बघून मी तुम्हाला सावध करायला आलो. एक मुंगी तुमच्या कानात उतरलेली मी बघितली. थांबा काढतो तिला बाहेर," असं म्हणत सशानं आणखी मुंग्या आत ढकलल्या.

"बरं केलंस रे बाबा माझ्या," सश्याचं सांगणं खरं मानून गेंडा म्हणाला. "तुझा काटकुळा पायच चांगला आहे बघ ह्या कामासाठी. माझा खांबासारखा जाड पाय काही उपयोगाचा नाही इथं. काय सांगू तुला ह्या मुंग्यांचा त्रास."

"माझे पाय काटकुळे दिसले तरी फार ताकद आहे त्यांच्यात. शर्यत आपली रस्सीखेचीची! तुम्हाला मी ओढत नेईन. नदीतून पार त्या टेकडीपलीकडे!"

अनुभवी गेंडा हसला. पण त्यालाही सशानं भरीवर घातलं. तोहि सशाशी खेळ खेळायला तयार झाला. लगेच सशानं दोराचे दुसरे टोक गेंड्याच्या मागच्या पायाला बांधले आणि तो मोठ्यानं ओरडला. "हां, ओढा!"

ही हाक ऐकताच गेंड्याच्या कानातल्या मुंग्या चवताळून चावू लागल्या. वेदनेनं डरकाळी ठोकून गेंडा सुसाट सुटला.

दरम्यान पाणघोड्याला सगळ्याचाच विसर पडला होता. सशाशी झालेलं बोलणंही तो विसरून गेला होता. पाण्यात बसून पेंगता पेंगता एकाएकी त्याच्या मागच्या पायाला ओढ बसली आणि काय झालं हे कळायच्या आत तो नदीच्या पाण्यातून दरादरा बाहेर ओढला गेला, वारुळापर्यंत अर्धे अंतर वर गेला.

पाणघोड्याच्या लक्षात आल्याबरोबर तो पाय रोवून उभा राहिला आणि त्यानं उलट्या दिशेला जोरात ओढ दिली.

गेंडा आणि पाणघोडा दोघंही जबरदस्त ताकदवाली जनावरं बळ एकवटून परपस्परांविरूद्ध दिशेला ओढ घेऊ लागली. ते बघून उमव्हण्डला सशाला एवढं हसं फुटलं की एका उसळीसरशी तो बिळाबाहेर पडून गडगडत वारूळाच्या पायथ्याशी येऊन पडला. त्याला बघून दोघाही शक्तीमान प्राण्यांना मनोमन वाटलं की आपण फसलो. ह्या सशानं फसवलं.

रागान वेडे होऊन ते दोघेही सशावर धावले. झालेली आपली फजिती हा इतर कुणाला सांगायच्या आत ह्यालाच धुळीला मिळवलं पाहिजे असं त्यांना वाटलं.

ते दोघे चाल करून येईपावेतो उमव्हंडला ससा तेथेच थांबून होता. आणि मग ऐन क्षणी त्या दोघांच्या वाटेतून हळूच बाजूला झाला. पाणघोडा आणि गेंडा एवढ्या वेगाने होते की ते थांबूच शकले नाहीत. धडामकन ते एकमेकांवर येऊन आदळले आणि त्यांची टक्कर झाली. दोघांनीही एकमेकांना चांगलीच दुखापत केली. आंधळ्या संतापानं ते एकमेकांशी झगडू लागले. इतक्यात उमव्हण्डल्याच्या हसण्याची उकळी त्या दोघांच्या कानी आली.

आता मात्र आपला खेळ संपला हे सशाच्या लक्षात आलं आणि तो उडी घेऊन झुडुपात धावला. ही मज्ञा इतरांना सांगण्याची त्याला घाई झाली होती.

आपल्या कानात तांबड्या मुंग्या गेल्यात असे गेंड्याला आजही वाटतं. त्याच्या मेंदूत त्या शिरल्यात - असं काहीजण म्हणतात आणि त्यामुळं गेंडा संतापी वागतो.

पाणघोडा आजही रात्री उठून ससा कुठं सापडतो का म्हणून नदी किनाऱ्यावर हिंडताना दिसतो. कधी हा दुष्ट ससा सापडतोय आणि आपण त्याला नदीतल्या मगरीपुढं टाकतोय असं त्याला अजून वाटत असतं.

**सशाविषयी माहिती**

**जात :**

**ससा *(Lepus saxatils)***

एकटा रहाणारा प्राणी.



| | नर | मादी |
|---|---|---|
| उंची | 6 इंच | 6 इंच |
| वजन | 2½ किलो | 2 किलो |
| जन्मल्यानंतरचे वजन | 80 ग्रॅम | 80 ग्रॅम |
| आईला पिणे | 1 महिना | 1 महिना |
| वयात येणे | 8 महिने | 8 महिने |
| गाभण काळ | — | 1 महिना |
| पिल्लांची संख्या | — | 2 |
| आयुष्य | 5 वर्षे | 5 वर्षे |

**ओळख :** युरोप, अमेरिका किंवा इतर देशातील सशासारखाच दिसतो. आफ्रिकेतील सशांच्या अनेक जातीपैकी सर्वत्र आढळणारी एक जात म्हणजे स्क्रब हेअर. ह्याला लांब कान असतात, पुढील पायांपेक्षा बळकट आणि लांब असे मागले पाय असतात. शेपटी पांढरी. तिच्यावर मध्यापर्यंत जाड काळा पट्टा.

**जन्मस्थान :** उघडे माळरान, तुरळक झाडाझुडपांचा प्रदेश.

**सवयी :** सशाचा रंग गवतासारखा असतो. जागच्या जागी मुरून तो शिकाऱ्याला चकवतो. तुमचा पाय त्याच्या अंगावर पडण्याच्या आधीच तो उडी घेऊन नागमोडी पळत दूर जातो. दिसेनासा होतो. त्याला धरणे कठीण असते. गरूड, घुबड, अजगर आणि इतर अनेक प्राणी सशाची शिकार करतात. ह्यात चित्ता हा एकच प्राणी सशाला पळण्यातही पकडू शकतो. इतर हिंस्त्र पशूंना त्याच्यापर्यंत लपतछपत जाऊन त्याच्यावर झडप घ्यावी लागते. ससा निशाचर प्राणी आहे. दिवसा क्वचित बाहेर पडतो. गवतात किंवा जाळीत दडून रहातो.

आफ्रिकेतल्या लोककथात अनेकदा ससा हा नायक असतो. त्याची व्यक्तीरेखा चहाटळ, खोडकर अशी रंगवलेली असते. तो थापाड्या असतो. आपण कसे पक्के आहोत, विशेष करून अंगापिंडाने मोठ्या आणि शक्तिशाली जनावरांना मामा बनवणे आपण किती सहज करतो, असे तो सर्वांना सांगतो.

**अन्न :** वेगवेगळ्या तऱ्हेची गवते हा ससा खातो. गवतातून त्याला ओलावा मिळतो. पाण्यापाशी रहावे लागत नाही.

**वेत :** गाभण माद्यांना एका वेळी दोन पिल्ले होतात. रॅबिटप्रमाणे त्यांना बिळात रहावे लागत नाही. जाड गवतात उथळ असे घरटे करून त्यांत पिल्लांना ठेवून माद्या चरायला जातात. ही पिल्ले दगडाप्रमाणे एका जागी न हलता बसून राहून शिकाऱ्यापासून स्वतःचे रक्षण करतात.



# डॅझीला शेपटी का नाही

(कऊस जमातीमधील एक बोधकथा)

फार फार पूर्वी, म्हणजे मानवजात जन्माला यायच्याही आधी, सिंह हा सगळ्या जंगली जनावरांचा राजा होता. शिवाय त्यालाच एकट्याला शेपटी होती. बाकी जनावरांपैकी कोणालाही नव्हती.

सृष्टीनिर्मात्याने दिलेल्या वैभवाचा सिंहाला अभिमान होताच. पण त्याला फार वाटत असे की इतर जनावरांना निर्मात्याने शेपट्या द्यायला पाहिजे होत्या. कारण जनावरांना शेपटीचा फारच उपयोग आहे. शिवाय एकट्या सिंहानेच ती मिरवणे हेही योग्य नाही.

मग जनावरांच्या ह्या राजाने ठरवले की आता आपणच शेपट्या बनवाव्यात आणि त्या प्रजाजनांना वाटाव्यात.

सिंह कामाला लागला. नाना आकाराच्या, नाना मापाच्या, नाना रंगाच्या शेपट्या त्याने तयार केल्या. आणि काम पुरे झाल्यावर त्याने बॅबून माकडाला फर्मावलं की, "तू सगळ्या जनावरांना दरबार शीलाखंडासमोर हजर रहायला सांग. कोणालाही बोलावण्याचे विसरू नकोस."

बॅबून माकड गेला आणि त्याने सर्वांना बोलावणं केलं. रात्र पडू लागताच जनावरे दरबार शिळेकडे येऊ लागली. आळशी डॅझी मात्र आला नाही. त्याला वाटलं उगीचच फार चालणं पडेल.

परत जाणाऱ्या माकडापाशी त्याने सिंहाला नजराणा पाठवला. "एवढ्या मोठ्या राजापाशी यायला माझ्यासारख्या किरकोळ प्रजाननाला शरम वाटते, असंही राजाच्या कानावर घाला," हे सांगितलं आणि आपलं म्हणणं राजाच्या कानावर गेलंच असं समजून डॅझी गुहेत जाऊन पुन्हा डुलक्या घेऊ लागला.

आपल्याला आवडलेली शेपटी प्रत्येक जनावरानं दाखवल्यावर सिंहानं शेपट्या वाटल्या. पण नजर अधू झाल्यामुळे शेपट्या वाटताना चुकाही केल्या. (ह्यामुळेच आज आपण पहातो. की खारीचे शेपूट तिच्या

अंगाच्या लांबीपेक्षा जास्ती आहे. आणि हत्तीला फारच तोकडी आणि जाडजूड शेपटी आहे.) तरी बरं, त्यावेळी चांगला चंद्रप्रकाश होता.

सगळ्या शेपट्या वाटून झाल्या. सिंहाच्या लक्षात आलं की डॅझी कुठं दिसला नाही. सगळी जनावरे शेपट्या एकमेकांना दाखवून अभिनंदन करण्यात दंग असताना माकडाला डॅझीच्या निरोपाची आठवण आली. त्याने तो सिंह महाराजांना सांगितला. डॅझीने राजाचं फर्मान मानलं नाही म्हणून सिंहाला फार राग आला. पण तो लवकर निवला. एक लहान, केसाळ शेपटी माकडापाशी देऊन सिंहानं ती डॅझीला द्यायला सांगितलं. कारण सगळ्याच जनावरांना शेपट्या असाव्यात अशी राजाची इच्छा होती.

माकडांनी परत येताना आळशी डॅझीला धडा मिळालाच पाहिजे असं ठरवलं. तो राजाच्या मेहरबानीला पात्र व्हावं असा नव्हताच. त्याला कशाला आयती ही शेपटी? देऊच नये. असे ठरवून माकडांनी आपल्याला मिळालेल्या नव्या कोऱ्या शेपटीच्या टोकाला ही केसाळ शेपटी लावून टाकली. त्यांच्या शेपटीला जास्त शोभा आली.

टेकाडावर असलेल्या डॅझीच्या दगडी बिळाशी जाऊन माकडांनी आपल्या शेपट्या त्याला दाखवल्या आणि तुला धडा शिकवण्यासाठी आम्ही काय केलं हेही सांगितलं. शेवटी ताकीद दिली, इथून पुढं आळस सोडायचा व राजाचे हुकूम मानायचे.

बिचाऱ्या डॅझीला ही गोष्ट फारच लागली. पण तो आळशीच होता. त्यामुळे त्याने काही केलं नाही. म्हणूनच आजतागायत डॅझीला शेपूट नाही.

**डॅझीविषयी माहिती**

**जात :**

**डॅझी किंवा रॉक हायरॅक्स** ***(Procavia capensis)***

दोनशेजणांची वसाहत करून रहातो.

| | नर | मादी |
|---|---|---|
| उंची | 8 इंच | 8 इंच |
| वजन | 4 किलो | 3 किलो |
| जन्मल्यानंतरचे वजन | 250 ग्रॅम | 200 ग्रॅम |
| आईला पिणे | 4 महिने | 4 महिने |
| वयात येणे | 1 वर्ष | 1 वर्ष |
| गाभण काळ | — | 7½ महिने |
| पिल्लांची संख्या | — | 2-3 |
| आयुष्य | 7 वर्षे | 7 वर्षे |



**ओळख :** गोल डोके आणि लहान कान असलेले गबदुली लहान जनावर. याचे पाय आखूड असतात. अंगावर दाट लोकर असते. रॉक रॅबिट म्हणूनही ओळखले जाणारे हे प्राणी अंगाने थोड्या मोठ्या रॅबिट एवढेच असतात. पण हे रदंत म्हणून ओळखल्या जाणाऱ्या प्राणीवर्गातील नाहीत तर हे हत्ती जातीशी जवळचे संबंधित असे आहेत.

**जन्मस्थान :** डॅझीच्या वसाहती असतात. हे गुहांतून, खडकाच्या कपारीतून रहातात.

**सवयी :** पायाच्या तळव्यांना राठ केसाचे आच्छादन असल्यामुळे ह्यांना गुळगुळीत खडकांवरून किंवा झाडांच्या फांद्यावरून न पडता पळता येते. डॅझी कर्कश्य, गळाकाढू ओरडतात. हे ओरडणे वसाहतीमधील इतरांना धोक्याची सूचना देणारे असते. धोक्याच्या वेळी हे लहान गुहांतून, खडकांच्या भेगातून शिरून नाहीसे होतात. त्यांच्या शिकाऱ्यांना ते सापडत नाहीत. ह्याचे शिकारी बिबटे, गरूड, अजगर आणि इतर प्राणी असतात. माणसांची वस्ती जवळ असते तिथे डॅझीना धोका असतोच. कारण त्याच्या लोकरींना व कातड्यांना मोठा भाव मिळतो. थंडीत उपयोगी अशी कांबळी करायला ही कातडी उपयोगाची असतात.

**अन्न :** पुढील सुळे लांबडे असूनही डॅझी शाकाहारी आहेत. झाडपाला, फळे, गवत, डहाळ्या हेच त्यांचे खाणे आहे.

सुळे हे त्यांचे एकमेव हत्यार आहे. त्याने ते जबर चावा घेतात.

**वेत :** डॅझी मादी वर्षाला दोन पिल्लांना जन्म देते. त्यामुळे रॅबिटप्रमाणे त्यांची वसाहत झपाट्याने वाढत नाही.



# शहामृगाचा वेडेपणा

(बुशमन लोकांमधील एक कथा)

कोणे एके काळी जगात कुणाला अग्नी माहीतच नव्हता. मान्टिस (सृष्टीनिर्मात्याचा मदतगार) हा जगाला अग्नी द्यावा का नको ह्या मनःस्थितीत होता. त्याला काळजी होती, कोणी जीव अग्नीचा उपयोग करून स्वतःला जाळून गेला तर? म्हणून त्याने अग्नीला सांभाळण्याची जबाबदारी शहामृगावर सोपवली. शहामृगाने सांभाळल्यावर अग्नीशी खेळ खेळायला कोणी जाणार नाही. मान्टिसनं विचार केला, "एखाद्या इमानी आणि कधीही हार न पत्करणाऱ्या शहामृगाजवळून कुणी अग्नी पळवला तर त्यांना अतिशय हुषार मानलं पाहिजे. अशांकडून अग्नीचा दुरूपयोग होणारच नाही."

मान्टिसने सक्त सूचना देऊन अग्नी शहामृगाच्या हवाली केला आणि तो स्वर्गलोकात निघून गेला शहामृगाने अग्नी सतत आपल्या पंखाखाली लपवून ठेवला. पण पहिल्या आदिवासीने शहामृग एरवी अग्नी कोठं ठेवतो हे शोधून काढलं. त्याला अन्न शिजवण्यासाठी अग्नी पाहिजे होता. तसेच थंडीच्या रात्री स्वतःचं शरीर उबदार ठेवण्यासाठी आणि रात्री त्याच्या वासावर येणाऱ्या हिंस्त्र श्वापदांना दूर ठेवण्यासाठी त्याला त्याच्या घरातल्या माणसांना अग्नीचा फारच उपयोग होता.

शहामृगापासून अग्नी पळवून नेण्याची योजना आदिवासीने आखली. ह्याला जनावरांशी बोलता येत होतं. हा शहामृगापाशी गेला. नम्रपणानं नमस्कार करून उभा राहिला. शहामृगाने त्याच्याकडे संशयाने रोखून पाहिलं. नमस्काराची परतफेड केली.

"हे श्रेष्ठ आणि शहाण्या शहामृगा," आदिवासी बोलला, "हे पक्षोत्तमा, मी तुमच्यासाठी आज शुभ वर्तमान घेऊन आलो आहे."

"होय का?" शहामृगाने उत्सुकतेने विचारलं.

"हो, फारच उत्तम बातमी आहे," आदिवासी म्हणाला, "मला स्वप्नात दिसले की आपण स्वतः आकाशात उडू शकता."

शहामृग बिथरल्यासारखा दिसला, तो म्हणाला, "ते कसं काय?"

"सूर्य उगवायच्या आत, जोरात सुटलेल्या वाऱ्यावर पंख उभारून तुम्ही उभे राहिलात तर तुम्हाला आभाळात उडण्याचे पारितोषिक मिळेलच असं समजा. तुम्ही डोळे बंद केलेत आणि दोन्ही पंख पसरले तर अलगद आकाशात जाल, गरूडासारखे तिथे तरंगाल."

आकाशात गरूडासारखे तरंगायला मिळणं ही कल्पना शहामृगाला अतिशय आवडली. आजवर त्याने ही एकच आकांक्षा मनात जपली होती. दुसऱ्या दिवशी दिवस उगवायच्या आत टेकडीवर जाऊन त्याने पंख पसरले. डोळे घट्ट मिटून ठेवले. गार झोंबरा वारा सुटला होता. दरम्यान, शहामृगाने अग्नी ठेवलेल्या गुप्त जागी आदिवासी लपतछपत गेला. त्याने अग्नी घेतला आणि वेगाने पळ काढला.

अशा रितीने, सर्वांत अतिशय मूल्यवान अशी माटिन्सकडून मिळालेली देणगी माणसाच्या ताब्यात आली.

अग्नी नाहीसा झाल्यामुळे आणि आकाशात उडणे न जमल्याने शहामृग मनाने पार कोसळला. तो इतका वेडसर झाला की, अंडी उबवण्यासाठी बसल्यावर, "आपण ह्यावर का बसलो आहे" हे लक्षात रहावे म्हणून तो दोन अंडी आजही घरट्याबाहेर ठेवतो.

# शहामृगाची मान लांब का आहे

(सेसोथो लोकांमधील कथा)

कोणे एके काळी, शहामृगाची मान इतर पक्षांप्रमाणे बेताची होती. शहामृग आणि मगर त्या काळी एकमेकांचे मित्र होते. ही मैत्री बघून इतर जनावरांनी शहामृगाला वारंवार सावध करण्याचा प्रयत्न केला.

"संभाळ रे बाबा! मगर हे काही चांगलं जनावर नाही. त्याच्यावर कोणी कधीही विश्वास ठेवू नये." शहामृग हा पक्षी भला मोठ्ठा आहे, पण त्याचं डोकं लहान आहे आणि मेंदू तर फारच लहान आहे. त्यामुळे त्याने ह्या सावधगिरीच्या इशाऱ्याकडे दुर्लक्ष केलं.

एके दिवशी मगरीला फार भूक लागली. गेले कित्येक दिवस तिच्या पोटात काही गेलंच नव्हतं. त्यामुळे सगळी जनावरं तिला घाबरून होती. कोणीही तिच्या जवळपास फिरकत नव्हतं. जवळ गेलं की ही जबड्यानं पकडेल आणि ओढून नेईल ही भीती सगळ्यांनाच होती.

मग मगर शहामृगाला म्हणाली, "मित्रा शहामृगा, आज माझा दात फार ठणकतो आहे. माझ्या

जबड्याला इतके दात आहेत की त्यातला एखादा दुखतच असतो रोज. मेहरबानी कर आणि माझ्या जबड्यात तुझं तोंड घालून तपास घे. नेमका कोणता दात दुखतोय ते मला सांग."

आणि मगरीनं आपला जबडा उघडला.

वेड्या शहामृगाने मगरीच्या जबड्यात डोकं घातलं. आणि दुष्ट मगरीनं खाटकन जबडा मिटला. शहामृगाला ती खोल पाण्यात ओढायला लागली. मनात म्हणाली, "आता ह्याला नेऊ आणि चट्टामट्टा करू."

शहामृग मूर्ख होता पण अंगापिंडानं दांडगा आणि बळकट होता. त्याला काही मरायचं नव्हतं. तो लागला उलट्या दिशेने ओढायला. दोघही इरेला पडले. ही इकडं नेटानं ओढते आहे नि तो तिकडं नेटानं ओढतोय. ह्या ओढाओढीत शहामृगाची मान ताणून ताणून लांबली. बापड्या शहामृगाला अतोनात वेदना सहन कराव्या लागल्या, पण त्याने हार खाल्ली नाही.

शेवटी मगरच दमली. तिनं शहामृगाचे डोके सोडून दिलं. शहामृग धुम् पळाला. त्या दिवसापासून त्याने नदीपासून लांब वाळवंटात रहाणे पत्करलं. ताणून लांब झालेली त्याची मान अजूनही तशीच आहे. आणि तो कधी मगरीच्या जवळपासही जात नाही.

# शहामृग आणि त्याची पिल्ले

(मसाई लोकांमधील कथा)

पुष्कळ पूर्वीची गोष्ट आहे. शहामृगाच्या जोडप्यातल्या मादीने बरीच अंडी घातली, उबवली आणि दोघे आपली पोरे वाढवू लागली.

एके दिवशी ही एकटी पिल्लं सिंहाने पाहिली. त्यांच्या राखणीसाठी आसपास कोणी नव्हतं. सिंहाने सगळी पिल्लं उचलली आणि सरळ आपल्या गुहेत नेऊन ठेवली, म्हणाला, "रोज एक एक खाऊ."

परत आल्यावर शहामृगीनं पाहिलं तर पिल्लं नाहीत आणि सिंहाच्या पायाचे ठसे उठलेले. त्या मागावर ती गुहेत गेली. सिंहाला बोलली, "माझी पिल्लं दे." सिंह म्हणाला. "नाही देणार. चालायला लाग." अंगावर धावून जाऊन सिंहाने शहामृगीला पळवून लावलं.

मग शहामृगी जातपंचायतीच्या समोर गेली. जनावरांच्या सर्व जातींनी निवडलेले, पुष्कळ पावसाळे पाहिलेले शहाणे पंच जातपंचायतीमध्ये होते. त्यांनी शहामृगीचं म्हणणं ऐकून घेतलं. त्यांना सिंहाचं भय होतंच. त्यांनी एकमेकात चर्चा करून निकाल दिला, "पिल्लं सिंहाची आहेत!" शहामृगीची फार निराशा झाली.

मग शहामृगीने जनावरांची सभा बोलावली. सिंहाच्या गुहेसमोर एक मोठं वारूळ होतं. ह्या वारूळात बीळ करून एक मुंगूस रहात होतं. त्याच्या बिळाला मागेही दोन दारे होती.

वारूळाशेजारी सगळी निमंत्रित जनावरं जमली. त्यांनाही सिंहाची भीती होतीच. त्यांनी निकाल दिला की, "पिल्लं सिंहाचीच आहेत." इथं मुंगूसाने आवाज उठवला. मुंगूस म्हणाला, "अंगावर केस असलेल्या

कोणाही प्राण्याला पंखवाली पिल्लं झालेली मी कधी पाहिलेली नाहीत. तुम्ही लोक काही का ठरवाना, पण पिल्लं शहामृगाचीच आहेत."

सिंहाने मुंगसाची ही भाषा ऐकली आणि त्याला फार संताप आला. फाटकं मुंगूस ते काय आणि त्यानं सिंहाचा अधिकार धुडकावून लावावा?

सिंह त्वेषाने झेपावून मुंगूसाच्या अंगावर गेला. पण मुंगूस विलक्षण चपळ. ते सटकलं, वारूळातल्या बिळात घुसलं. भुयारातून जात जात दुसऱ्या बिळाच्या मागच्या दाराने बाहेर पडले. सिंहाला ह्या बिळाचा आणि दाराचा काही पत्ता नव्हता. तो आपला मुंगूसाच्या बिळाच्या तोंडाशी टपून बसला. केव्हा तरी हे लेकाचं बाहेर पडेलच की! जातंय कुठं! बरं सापडलं आहे बिळात.

दिवसापाठोपाठ दिवस गेले. पण सिंहानं जागा सोडली नाही. अखेर सिंह भुकेने, रात्रंदिवस एका जागी जखडल्यामुळे थकला. घेरी येऊन धरणीवर पडला.

ते पाहून शहामृगी धावत गुहेकडे गेली. तिनं आपल्या पिल्लांची सुटका केली. पिटुकल्या मुंगसाचे उपकार ती कधी विसरली नाही.

शहामृगी आजही अतिशय विसराळू आहे. अंड्याबाहेर पडल्या पडल्या तिच्या पिल्लांना स्वत:ची काळजी घ्यावी लागते.



**शहामृगाविषयी माहिती**

**जात :**

**शहामृग *(Panthera pardus)***

नर आणि मादी अशी जोडीने असतात.

वयात आलेले पक्षी घोळक्याने रहातात.



| | नर | मादी |
|---|---|---|
| उंची | 6 फूट 9 इंच | 6 फूट |
| वजन | 140 किलो | 120 किलो |
| जन्मल्यानंतरचे | | |
| वजन | 1½ किलो | 1½ किलो |
| वयात येणं | 8 वर्षे | 8 वर्षे |
| अंडी उबवणे | 45 दिवस नरमादी दोघेही करतात. | |
| अंड्यांची संख्या | — | 12-20 |
| आयुष्य | 50 वर्षे | 50 वर्षे |

**ओळख :** शहामृग हा जगातील सर्वांत मोठा पक्षी आहे. ह्याला लांब पाय आणि लांब वाकडी मान आहे. पोक काढून चालणाऱ्याचे जसे दिसते तसे दिसणारे शहामृगाचे शरीर हे काळ्या रंगाच्या ठिगळ्यांनी झाकलेले असते. पंख आणि शेपटी यांची टोके पांढऱ्या रंगात बुडवून काढल्यासारखी दिसतात. मादीचा रंग उदी आणि पांढरा असतो. शहामृगांना उडता येत नाही पण वेगाने धावता येतं. ताशी सत्तर किलोमीटर (ताशी चव्वेचाळीस मैल) वेगाने शहामृग धावू शकतो.

**जन्मस्थान :** आफ्रिकेतील बरड, रुक्ष, कमी पावसाच्या भागात शहामृग आढळतो.

**सवयी :** सिंह आणि चित्त्याकडून शहामृगाची शिकार होते. शहामृगाची अंडी आणि पिल्ले काही वन्य प्राणी खातात. शहामृगाच्या पिल्लांना निसर्गाने असा रंग आणि अशी अक्कल दिलेली आहे की ती रानाशी सहज एकजीव होऊन दिसेनाशी होतात. अंड्यातून बाहेर येताच धूम पळण्याएवढी ताकद त्याच्या पायात असते.

वयाने मोठे शहामृग पायाचा उपयोग पळण्यासाठी तर करतातच, पण त्यांना खाऊ पहाणाऱ्यांना पायाचे हत्यार वापरून दूर ठेऊ शकतात. त्यांना लहान लहान टोळ्या करून किंवा एकटे एकटे रहाणे सोयींचे वाटते असे दिसते.

**अन्न :** शहामृग हे प्रामुख्याने शाकाहारी आहेत. गवत, कांगुण्या, बिया, रानफळे हेच त्यांचे खाणे असते. हे कीटकही खातात. लहान लहान गोटे खडेही गिळतात. खाल्लेल्या कठीण पदार्थांचे दळण व्हावे म्हणून ते तसे करतात.

**वेत :** नर आणि मादी हे जन्माचे सोबती म्हणूनच एकत्र येतात. अंडी उबवण्याचे काम दोघे वाटून घेतात. काळा रंग असलेला नर रात्री अंड्यावर बसतो तर उदी रंगाची मादी दिवसा अंड्यावर बसते. त्यामुळे शहामृगाचे घरटे आणि अंडी पहायला मिळणे कठीण असते.

शहामृगाची मादी घरटे करीत नाहीच. जमिनीचा खोलगट भाग निवडून तेथे ती वीस अंडी घालते. लहान पिल्ले स्वत:चे रक्षण करायला समर्थ होईपर्यंत बापच त्यांना संभाळतो.



# जीव असलेल्या दगडांची गोष्ट

(स्वाझी लोकांमधील एक दंतकथा)

सृष्टीनिर्मात्याने सगळी जनावरे निर्माण केल्याबरोबर प्राण्यांची एक जोडीही निर्माण केली. हिला म्हणतात, 'जिवंत दगड.' कारण ती एखाद्या भेगाळलेल्या हुरमुजी दगडासारखे दिसते. ती जोडी म्हणजे कासव आणि कासवीण.



ही जोडी वर्षानुवर्ष एकत्र राहिली. पण त्यांच्या दुर्भाग्यानं त्यांना मूल झालं नाही. वर्षामागून वर्षे गेली. प्रत्येक वर्षी त्या जोडप्याला वाटे, आता आपल्याला अपत्य होईल. पण तसं काही झालं नाही.

अखेरीस, कासविणीचा नवरा सृष्टीनिर्मात्याकडे गेला आणि नम्रपणाने म्हणाला, "आमची आशा पुरी होईल का? वर्षामागून वर्ष गेली पण आम्ही अद्याप अपत्यहीनच आहोत." त्यावर निर्माता म्हणाला, "अरे, तुम्ही दोघेही फार फार म्हातारे झाला आहात. आता तुम्हाला अपत्यसंभव नाही. बाळ होणार नाहीच. तुझी बायको ह्या अपत्यभाराने मरून जाईल. आता, 'आपण दोघेच एकमेकांना आहोत' असे समजून तुम्ही सुखी राहिले पाहिजे."

हे ऐकून ती नवराबायको फार निराश झाली. नंतर कासवानं विचार केला. त्याला वाटले, सृष्टीनिर्मात्याची काहीतरी गफलत होत आहे. आम्हाला बाळं झाली नाही तर कासवांची जातच नाही का संपून जाणार? आम्ही पाषाणासारखे आहोत म्हणे, म्हणजे आम्हाला वय नाहीच. दोघे पुन्हा सृष्टीनिर्मात्याकडे गेले. पण काहीच उपयोग झाला नाही.

मग मात्र कासवाची खात्री झाली. सृष्टीनिर्मात्याने केलली ही चूकच आहे. पुन्हा दोघे त्याच्या पायाशी गेले, पायावर पडले.

निर्मात्याला कासवांच्या धैर्याचे, चिकाटीचे कौतुक वाटलं. त्यांच्या दु:खाबद्दल मनात कणव आली. निर्माता म्हणाला, "अरे, जा सुखी व्हा, तुम्हाला लेकरं होतील. हां, तुझ्या बायकोला सांग, प्रकृतीची मात्र काळजी घे. ती अंडी घालण्याच्या पार पलीकडे गेली आहे वयानं. अंडी घालायची वेळ येईल तेव्हा



अंड्यांवर लक्ष ठेवलं पाहिजे. ती उबदार रहातील असं केलं पाहिजे. उबदार म्हणजे गरम नव्हे. अंडी उबून पिल्लं बाहेर पडेपर्यंत तिन आपल्या अंगाची उब अंड्यांना देत राहिले पाहिजे."

कासवाला फार आनंद झाला. ही आनंदाची बातमी सांगायला तो घराकडे गेला. अंडी घालण्याच्या त्रासामुळे बायको मरूनसुद्धा जाण्याचा संभव आहे. पण तिच्यापाशी तो हे बोलला नाही. "अंड्यांची काळजी घे" तेवढं बोलला. कासविणीनं सृष्टीनिर्मात्याच्या सूचनेनुसार सगळं केलं. तिनं स्वतःचं खाणं संभाळलं, भरपूर विश्रांती घेतली, जड कामे केली नाहीत.

फार कष्ट न होता तिला अंडी घालता आली. ती नीट उबली गेली. उबवण्याचा काळ संपला. चार गोड बाळे जन्माला आली. सृष्टीनिर्मात्याच्या सांगण्यानुसार आईने त्यांना काळजीपूर्वक वाढवलं. पण अखेरीला निर्मात्याने भाकित केलं होतं तसं घडलंच. शक्तिपलिकडे कष्ट पडल्यामुळे, थकलेली कासवीण मरून गेली. एकटा राहिलेल्या नवऱ्याने पिल्लांना सांभाळण्याचा आटोकाट प्रयत्न केला. पण जोडीदारीण गेल्याच्या आघातामुळे तोही लवकरच मरून गेला.

सृष्टीनिर्मात्याला ह्या पोरक्या बाळांची करूणा आली. त्याने स्वतः त्यांची काळजी वाहिली. त्यांना खाणं पुरवलं.

आता कोणत्याही कासविणीला आपल्या अंड्याची, आपल्या पिल्लांची काळजी नसते. सृष्टीनिर्मात्याने सूर्याला आज्ञा केलेली आहे की कासवाची अंडी उबदार रहातील हे बघ. अंडी उबून त्यातून पिल्लं बाहेर पडली की ती स्वतःची काळजी घेतात. त्यांना अन्न कसं मिळवावं हेही निर्माता दाखवतो. आणि संकट आलं की कवचाच्या आत स्वतःला दडवून सुरक्षित कसं रहावं हेही सांगतो.

**कासवाविषयी माहिती**

**जात :**

**बिजागरी कासव** ***(Kinixys bellania bellania)***

एकटे रहाते

| | **नर** | **मादी** |
|---|---|---|
| उंची | 8 इंच | 8¾ इंच |
| वजन | 1½किलो | 2 किलो |
| अंड्याबाहेर आल्यावर लांबी | 1½ इंच | 1½ इंच |
| अंडी उबवणे | 1वर्ष | 1 वर्ष |
| अंड्यांची संख्या | — | 2-3 |
| वयात येणे | 8 वर्षे | 8 वर्षे |
| आयुष्य | 20 वर्षे | 20 वर्षे |



**ओळख :** जमिनीवरची कासवे ही पाण्यातील कासवांचे भाईबंदच असतात. दोघांचाही देह कठीण चिकट अशा कवचात असतो. वरूथिकांचे (horny shields) आवरण सर्व कवचाभोवती असते. जमिनीवरती कासवे आपले डोके, पाय आणि शेपूट व्यवस्थित कवचात ओढून घेतात. त्यांच्या जबड्यात दात नसतात. परंतु जबड्याच्या अस्थींवर धारदार चोचीसारखे दंतुर आवरण असते आणि हे आवरण दातांसारखे काम करते.

**जन्मस्थान :** आफ्रिकेच्या दक्षिण भागातील जमिनीवर कासवांच्या पुष्कळ जाती आहेत. त्या वेगवेगळ्या भौगोलिक वातावरणात रहातात. काही पाण्यात रहातात. त्यांना 'टेरापिन्स' म्हणून ओळखतात. तिथे जमिनीवरील वेगवेगळी कासवे विपुल प्रमाणात आढळतात.

**सवयी :** सबंध हिवाळा सुस्तीत घालवण्यासाठी बहुतेक कासवे आरामशीर असे बीळ खोदतात. ही बिळे जुन्यापुराण्या वारूळात किंवा मातीच्या बांधावर खोदलेली असतात. उन्हाळ्यातल्या पहिल्या पावसात त्यांना सुस्तीतून जाग येते. वणवा हा कासवाचा मोठा शत्रू असतो. कारण कासवे फार हळू चालतात. त्यांना खाऊन टाकणारे अनेक आहेत. गरूड कासवाला उचलून आकाशात उंच नेतात आणि खाली टाकून त्यांची कवचे फोडतात.

**अन्न :** कासवे शाकाहारी आहेत. झाडावरून पडलेली फळे, जमिनीवर वाढणाऱ्या रसाळ वनस्पती, आळंब्या, गवत हे त्यांचे खाणे आहे. जुनी हाडेही हे चघळतात. पण हे त्यांचे खाणे नसावे. खनिजे मिळावीत आणि दातांना धार यावी म्हणून हा खटाटोप ती करत असावीत.

**वेत :** नर आणि माद्या पावसाळा सुरू झाला की जुगतात. आपण उकरलेल्या बिळात मादी सहा ते बारा अंडी घालते. मग बीळ झाकते. वरची माती एकसारखी करते. पुढच्या पावसाळ्यात अंडी फोडून पिल्ले बाहेर पडतात ती पूर्ण वाढ झालेलीच. त्यांच्या अंगावर कवच असते. स्वतःचे पोषण ती स्वतःच करतात.

## आफ्रिकेतील वन्य कथा इंग्रजी भाषेत आणताना वापरल्या जाणाऱ्या काही शब्दांचे खुलासे

**Baobab बाओबाब** : आफ्रिकेतील सखल व शुष्क प्रदेशात सर्वत्र आढळणारे हे झाड. अनेक वर्षांचे दीर्घ आयुर्मान असलेले हे झाड त्याच्या वैशिष्ट्यांमुळे सहज कळून येते. मोठा घेर, गुळगुळीत साल, अत्यंत आंबट बिया असलेल्या शेंगा याला असतात. आपल्याकडे याला गोरख चिंच असे म्हणतात.

**Browser ब्राऊजर** : जी जनावरे कुरणात न चरता, गवत वगैरे न खाता, मुख्यत्वे करून पाला, कोवळ्या डहाळ्या, कोंब, असे झाडांचे भाग खाऊन जगतात त्यांना ब्राऊजर म्हटले जाते.

**Bush बुश** : आफ्रिकेच्या दक्षिण भागातील जे प्रदेश नैसर्गिक किंवा मूळचे असे अजूनही वाटतात त्यांना उद्देशून हा शब्द वापरला जातो. कधी कधी व्हेल्ड (veld) हा शब्दही पर्यायी म्हणून वापरला जातो.

**Calabash कलाबाश** : Gourd या इंग्रजी शब्दाला वापरला जाणारा हा एक प्रतिशब्द. कृपया Gourd या शब्दाचा अर्थ पुढे पहावा.

**Carnivore कार्निव्होअर** : अन्य प्राण्यांना खाऊन जगणारे हे प्राणी किंवा केवळ मांसाहारी प्राणी.

**Diurnal डाययुरनल** : दिवसा कार्यरत असणारे प्राणी. निशाचर प्राण्यांच्या विरूद्ध वागणारे हे दिनचर प्राणी.

**Ecology एकॉलॉजी** : पर्यावरणशास्त्र, एखाद्या गोष्टीभोवतालचा परिसर, त्यातील नैसर्गिक घटक, सजीव प्राणी यांचे अन्योन्य संबंध दर्शवणारे शास्त्र.

**Endangered एन्डेन्जर्ड** : एखाद्या जीवाची संख्या एवढी कमी कमी होत जाते की शेवटी त्याची जात कायमची नामशेष होण्याची भीती उभी रहाते. त्यावेळी त्या संकटग्रस्त जातीला उद्देशून हा शब्द वापरतात. नैसर्गिक आपत्ती, रोगराई, अन्य जीवांकडून बेसुमार शिकार, पोषणासाठी आवश्यक त्या गोष्टींची कमतरता होत जाणें, इत्यादी कारणांमुळे ती जात नामशेष होण्याचा धोका उत्पन्न होऊ शकतो. कधी कधी या जमातीतील जीवांच्या सवयी बदल्यानेही असे घडू शकते. अशा जेवढ्या जातींवर सध्या नामशेष होण्याचे संकट गुदरले आहे अशांची एक यादी (Red List) वर्ल्ड वाईल्डलाईफ फंड या जागतिक संस्थेने प्रसिद्ध केलेली आहे.

**Extinction एक्सटिन्क्शन** : जेव्हा एखाद्या जातीतील सर्वच्या सर्व जीव संपून जातात व त्यामुळे त्यांची उत्पत्ती पूर्णपणे थांबते तेव्हा वंशखंड हा शब्द त्यासाठी वापरतात. मग हे जीव जंगलात किंवा प्राणिसंग्रहालयातही असत नाहीत. ते कायमचे नष्ट झालेले असतात.

**Gemsbok cucumber जेम्सबॉक क्युकुंबर** : जमिनीवर पसरत जाणाऱ्या एका वेलाचे आफ्रिकेतील फळ. हे फळ कडू असले तरी त्यात मोठ्या प्रमाणात ओलावा असतो. उन्हाळ्यात पाण्याचे दुर्भिक्ष्य झाले की त्या प्रदेशात वावरणाऱ्या माणसांना व प्राण्यांना या फळाचा आधार असल्याने तिथे याचे महत्त्व फार असते.

**Gestation Period जेस्टेशन पिरीयड** : सस्तन प्राण्यातील मादीला गर्भधारणा झाल्यावर पिल्लू जन्म

घेईपर्यंत लागलेला काळ. थोडक्यात, गर्भावस्थेचा एकूण काळ किंवा गाभणकाळ.

**Gourd गूर्ड** : भोपळ्यासारखी फळे वाळल्यावर आतील भाग काढून टाकून ती पोकळ केल्यावर त्या कवचाला उद्देशून हा शब्द वापरतात. आफ्रिकेमध्ये याचा उपयोग पाण्याचे भांडे किंवा पिण्याचे भांडे म्हणून मोठ्या प्रमाणात करतात. याला आपण भारतात 'कमंडलू' म्हणतो. गूर्डला 'कलाबाश' हाही शब्द कधी कधी वापरला जातो.

**Grazer ग्रेझर** : गवत चरणारे जनावर.

**Gregarious ग्रिगेरिअस** : जे जनावर कळपात किंवा जथ्यात राहून जगणारे असते त्याला उद्देशून हे विशेषण वापरले जाते.

**Habitat हॅबिटॅट** : एखादा जीवाच्या किंवा वनस्पतीच्या भोवतालचा व निकटचा जो परिसर असतो व त्यामुळे त्या जीवाला जगण्यासाठी त्या परिसरातून सर्व काही उपलब्ध होते त्याला हा शब्द वापरतात.

**Herbivore हर्बिव्होअर** : फक्त वनस्पती खाऊन जगणारे शाकाहारी जनावर.

**Heritage हेरिटेज** : परंपरेने लाभलेला निसर्ग. आपल्याला आत्ता जो निसर्ग उपलब्ध आहे तो आपल्या पूर्वजांनी आपल्यासाठी सोडून दिला म्हणून. हाच निसर्ग, हीच निसर्ग व्यवस्था आपण आपल्या भावी पिढ्यांसाठी राखून ठेवणार आहोत.

**Hibernate हायबरनेट** : कडक थंडी असलेला हिवाळा किंवा जगण्यास अति कठीण असे हवामान असेल तर काहीं प्राणी अत्यंत गाढ व प्रदीर्घ काळ निद्रावस्थेत जातात. त्या प्रकाराला उद्देशून हा शब्द वापरला जातो. मराठीत याला 'हिमनिद्रा' हा शब्द वापरतात.

**Honey-guide हनी-गाईड** : हे एका पक्ष्याचे नाव आहे. हा आकाराने छोटा व रंगाने तपकिरी असतो. किडे, अळ्या यांसारखे जीव खाऊन तो जगतो. जंगलात हिंडणाऱ्या माणसांच्या पुढे पुढे राहून हा पक्षी त्यांना झुडपातील मधमाशांच्या पोळ्यांपर्यंत नेतो. मग माणसांनी पोळ्यामधील मध काढून घेऊन ते टाकून दिले की त्यातील अळ्या, किडे हे तो खातो. म्हणून मध गोळा करणारी माणसे या वाटाड्या पक्षाचे मार्गदर्शन घेतात.

**Hunter-gatherer हंटर-गॅदरर** : शेती न करता, भटक्या जमाती रानावनात केवळ निसर्गावर अवलंबून जगू पहातात. त्या भटक्या जमातींना उद्देशून हा शब्द आफ्रिकेच्या दक्षिण भागात वापरला जातो. बुशमन ही आदिवासी जमात अशीच आहे. मराठीतील 'वनवासी' हा शब्द इथे योग्य आहे.

**Incubation period इन्क्युबेशन पिरियड** : अंडी घातल्यापासून त्यातील जीवाची वाढ पूर्ण होऊन तो बाहेर येईपर्यंतचा कालावधी.

**Inganga इन्गान्गा** : मंत्रतंत्राचे उपचार करणाऱ्या वैद्याला आफ्रिकेच्या दक्षिण भागात हा शब्द वापरतात.

**Kopje कोपजे** : आफ्रिकेत 'आफ्रिकान्स' नावाची एक भाषा प्रचलित आहे. एखाद्या खडकाळ उंचवट्याला किंवा छोट्या खडकाळ टेकडीला उद्देशून हा आफ्रिकान्स भाषेतील शब्द संपूर्ण दक्षिण आफ्रिका खंडात सर्रास वापरला जातो.

**Kraal क्राल** : एखाद्या जागेभोवती कुंपण घालून, किंवा लाकडी ओंडक्याची भिंत घालून, किंवा दगडासारखी गडग्यांची भिंत घालून ती जागा संरक्षित केली तर त्या जागेला उद्देशून हा शब्द वापरला जातो. धान्य, गवत, कापलेली पिके, छोटेसे खेडे किंवा वस्ती यांच्या भोवती असे संरक्षण निर्माण केले जाते.

**Leguaan लेग्युआन** : याला वॉटर मॉनिटर (Water monitor) असेही म्हणतात.

**Mammals मॅमल्स** : शास्त्रीय परिभाषेत याला मराठीत 'सस्तन प्राणी' म्हटले जाते. या वर्गातील प्राण्यांची वैशिष्ट्ये म्हणजे त्यांचे रक्त उष्ण असते. ते अंडी न घालता शरीरातच गर्भ वाढवून त्याला जन्म देतात. या नवीन जीवांना अंगावरचे दूध पाजण्यासाठी माद्यांना स्तन असतात., तर नरांना केवळ तसल्या खुणा असतात. सस्तन प्राण्यांच्या छातीवर अर्धवट केसही असू शकतात. वटवाघळे. हत्ती, माकडे व माणसेही या वर्गात मोडतात.

**Migrate मायग्रेट** : जेव्हा मोसम बदलतो तेव्हा एखाद्या ठिकाणचे अन्न, भक्ष्य, पाणी संपते. मग जगण्यासाठी जिथे अनुकूल परिस्थिती असेल तिथे जाण्यासाठी मोठ्या प्रमाणावर जनावरे स्थलांतर करतात.

**Muti मुती** : परंपरागत चालत आलेल्या औषधांना आफ्रिकेच्या दक्षिण भागात 'मुती' असे म्हटले जाते.

**Nocturnal नॉक्टर्नल** : निशाचर प्राण्यांना उद्देशून हा शब्द वापरला जातो.

**Omnivore ऑम्निव्होअर** : शाकाहारी व मांसाहारी अशा दोन्ही खाद्यसवयी असलेले प्राणी.

**Oxpecker ऑक्सपेकर** : या नावाचा आफ्रिकेतील हा छोटा पक्षी गुरांच्या पाठीवर बसून त्यांच्या कातडीमधील बारीक जीव, लहान किडे, उवा, इत्यादी खात असतो.

**Pan पॅन** : नैसर्गिक पाणथळ जागा. एक छोटा पाणवठा.

**Predator प्रिडेटर** : इतर प्राण्यांना खाणारे भक्षक प्राणी.

**Prey प्रे** : जो प्राणी भक्ष्यक प्राण्यांकडून बळी जातो तो किंवा भक्ष्य.

**Pride प्राईड** : एका कुटुंबातील सिंहांचा घोळका.

**Resource रिसोर्स** : जेव्हा गरज लागेल तेव्हा मिळावे म्हणून त्या गोष्टीचा केलेला किंवा निसर्गतः झालेला साठा. थोडक्यात गरजेच्या गोष्टींचा साठा.

**Reptile रेप्टाईल** : सरपटणाऱ्या वर्गातील प्राणी. उदाहरणार्थ, साप, पाली, सरडे, इत्यादी. या वर्गातील प्राण्यांचे रक्त थंड असते व त्यांच्या पाठीवर खवले असतात.

**Sanctuary सॅन्क्चुअरी** : अभयारण्य. सर्व जनावरे किंवा ठराविक प्राणी यांच्या जगण्यासाठी निर्वेध राखून ठेवलेली एक जागा.

**Savannah सॅव्हाना** : अत्यंत विस्तृत असलेले गवताळ किंवा कुरणांचे प्रदेश.

**Scavenger स्कॅव्हेन्जर** : जे प्राणी मृत जीवांच्या अवशेषावर किंवा वनस्पतींच्या भागावर जगतात त्यांना उद्देशून हा शब्द वापरतात. गिधाडे, तरस, कोल्हे, हे दुसऱ्याने केलेली शिकार खाऊन झाल्यावर उरलेले खाऊन टाकतात. अशा रितीने ते एक प्रकारे निसर्गाचे सफाई कामगार असतात.

**Solitary सॉलिटरी** : या प्रकारातील प्राणी हे आपल्या आयुष्याचा बराचसा काळ एकट्याने स्वतंत्रपणे जगून काढतात.

**Species स्पिशिज्** : जीवांची विभागणी ही वंश (Race), कुळ (Family), गण (Order), जात (Specie), प्रजाती (Species) यात मांडते. एका जातीतल्या जीवांमध्ये बहुतेक सर्व गोष्टीसारख्या असतात. या वर्गातील जीवांचा अन्य वर्गातील जीवांशी संयोग होऊ शकत नाही. हा शब्द एकवचनी किंवा अनेकवचनी असा कसाही वापरला जातो.

**Territory टेरिटोरी** : एखाद्या प्राण्यांने जगण्यासाठी, खाण्यासाठी, किंवा माद्यांशी संयोग करण्यासाठी जाहीर केलेली आपली स्वत:ची खाजगी जागा. ह्या जागेत कोणीही प्रवेश केलेला त्या प्राण्याला आवडत नाही. अतिक्रमण करणाऱ्याशी झुंज देउन त्याला पिटाळून लावण्याचा तो निकराने प्रयत्न करतो. त्याने जाहीर केलेल्या त्याच्या खाजगी जागेला उद्देशून हा शब्द वापरतात.

**Tsamma-melon त्साम्मा - मेलन** : रूक्ष प्रदेशात जमिनीवर पसरत जाणारी आफ्रिकेतील एक वेल. कलिंगडासारखा याच्या फळात भरपूर ओलावा व गर असलेल्या बिया असल्याने उन्हाळ्यात हे फळ माणसांना व जनावरांना आधार ठरते.

**Umbrella tree अंब्रेला-ट्री** : आफ्रिकेतील बाभूळ. याचा विस्तार शेंड्याला सपाट झालेला दिसतो. हे झाड आफ्रिकेत बहुतेक ठिकाणी आढळते.

**Veld व्हेल्ड** : बुश (Bush) या शब्दाऐवजी हाही शब्द आफ्रिकेतील दक्षिण भागात वापरला जातो. मूळचे. नैसर्गिक किंवा तशा भासणाऱ्या प्रदेशाला उद्देशून हा शब्द वापरला जातो.

**Vlei व्हूले** : आफ्रिकान्स भाषेतील हा शब्द दलदलीच्या जागेला उद्देशून दक्षिण भागात प्रामुख्याने वापरला जातो.

**Wallow वॅलो** : जनावरांनी धुळीने अथवा चिखलाने सर्वांग माखून घेण्याच्या प्रकाराला हा शब्द वापरतात. कातडीवर वाढणाऱ्या उवा, पिसवा, वगैरेपासून मुक्तता मिळवण्यासाठी जनावरे धुळीत व चिखलात लोळतात. जिथे छोटीशी पाणथळ जागा, चिखलाचा उथळ खोलगट भाग असेल तिथे जाऊन जनावरे लोळतात. मराठीत अशा खोलगट भागाला 'लोटण' असे म्हणतात.

**Water-monitor वॉटर- मॉनिटर** : 6 फूट 9 इंच लांबीपर्यंत वाढ होणारा सरडा. आफ्रिकेतील नद्या व धरणे याच्या आसपास हा प्राणी बहुतेक आढळतोच. हा जिथे आहे तिथे जवळपास पाणी नक्की आहे असे समजले जाते. याला लेग्युआन (Leguaan) असा दुसरा शब्दही वापरला जातो.

**Weaning वीनिंग** : जेव्हा पिल्लू आईचे दूध पिणे सोडून स्वतंत्रपणे प्रौढांसारखेच त्यांचे अन्न खाऊ लागते तेव्हा हा शब्द वापरला जातो.

# मूळ लेखकाने वापरलेले संदर्भग्रंथ


**आफ्रिकन मिथस् ॲन्ड लिजेन्डस :** कॅथलीन अर्नोट, ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, 1962.

**ॲनिमल्स ऑफ ऱ्होडेशिया :** ॲस्टली मॅबर्ली, हॉवर्ड टिमिन्स, 1963.

**बान्टू फॉकलोअर :** मॅथ्यू एल. ह्यूवट, टी. मॅस्क्यू मिलर, 1906.

**बर्डस ऑफ साऊथ आफ्रिका :** ऑस्टिन रॉबर्टस, द ट्रस्टीज ऑफ जॉन व्होएलकर बर्ड बुक फंड, सी. स्टुईक यांच्याकडून वितरण, चौथी आवृत्ती, दुसरे पुनमुर्द्रण, 1978.

**कॉमन स्नेक्स ऑफ साऊथ आफ्रिका :** जॉन व्हिसर, पर्नेल अन्ड सन्स, 1979.

**फिल्ड गाईड टू द लार्जर मॅमल्स ऑफ आफ्रिका :** जीन डॉर्स्ट व पिअरी डॅन्डेलॉट, कॉलिन्स, दुसरी आवृत्ती, 1972.

**लिजेन्डरी आफ्रिका :** स्यू फॉक्स, एव्हरटन ऑफसेट, 1977.

**मॅमल्स ऑफ द क्रुगर ॲन्ड आदर नॅशनल पार्कस :** एच. कम्फ, नॅशनल पार्क ऑफ ट्रस्टीज ऑफ द रिपब्लिक ऑफ साऊथ आफ्रिका.

**माटाबेले फायरसाईड टेल्स :** फायलीस सॅव्हरी, हॉवर्ड टिमिन्स, 1962.

**मिथस् ॲन्ड लिजेन्डस ऑफ साऊथ आफ्रिका :** पेनी मिलर, टी. व्ही. बल्पिन, 1979.

**सायन्स ऑफ द वाईल्ड :** क्लाईव्ह वॉकर, नॅचरल हिस्ट्री पब्लिकेशन्स, 1981.

**साऊथ आफ्रिकन फोक टेल्स :** जेम्स ए. हनी, एम.डी. बेकर ॲन्ड टेलर, 1960.

**स्पेसिमेन्स ऑफ बुशमन फोकलोअर :** डब्ल्यू. एच. आय. ब्लीक आणि एल. सी. लॉईड, सी. स्टुईक प्रकाशन, 1968.

**स्वाझी फायरसाईड टेल्स :** फिलिस सॅव्हरी, हॉवर्ड टिमिन्स, 1973.

**टेल्स फ्राम दी ओकावांगो :** थॉमस जे. लार्सन, हॉवर्ड टिमिन्स, 1972.

**द बर्डस ऑफ आफ्रिका (खण्ड 1) :** लेस्ली ब्राऊन, एमिल अर्बन व केनेथ न्यूमन, ॲकेडेमिक प्रेस, 1982.

**द बुशमन स्पीक्स :** मेरी फिलिप्स, हॉवर्ड टिमिन्स, 1961.

**द गेम ॲनिमल्स ऑफ सदर्न आफ्रिका :** सी. टी. ॲस्टीली मेबल्स, नेल्सन, 1963

**द मॅमल्स ऑफ ऱ्होडेशिया, झांबिया ॲन्ड मालावी :** रे एच. एन. स्मिदर्स व इ. जे. बिअर्ली, कॉलिन्स, 1966.

**द मॅमल्स ऑफ द सदर्न आफ्रिकन सब रिजन** : रे एच. एन स्मिदर्स, युनिव्हर्सिटी ऑफ प्रिटोरीया, 1983

**कऊस फायरसाईड टेल्स :** फिलिप्स सॅव्हरी, हॉवर्ड टिमिन्स, 1963.

**झुलू फायरसाईड टेल्स :** फिलिप्स सॅव्हरी, हॉवर्ड टिमिन्स, 1961.




Printed at Impress Offset E-17, Sector 7, NOIDA